वही क्र ० ३-

# मेरुच्या शिखरीं चढेन अथवा चालेन पाण्यावरी आणि अन्य कविता

**काव्य संग्रह कृति : श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी एम ए (संस्कृत , AMU 1927)**

## Table of Contents

# "मेरुच्या शिखरीं चढेन अथवा चालेन पाण्यावरी"  आणि अन्य कविता

## काव्य संग्रह कृति : श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी  **एम ए (संस्कृत , AMU 1927)**



email:atul.pantojee@gmail.com

प्रथमावृत्ती:२०२४ ( चैत्र शुक्ल नवमी १९४६ शके )

## प्रस्तावना

सदर कृति  श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी ( जन्म: 1892, देवलोकगमन: 29 डिसेंबर  1974) , एम ए (संस्कृत , AMU 1927) ह्यांचे उपलब्ध असलेल्या दोन  हस्तलिखित वह्यांचे तंतोतंत पुस्तकीकरणाचे प्रयत्न आहे. यांत संस्कृत आणि मराठी  काव्य आहेत.

रचनाकाराचे अल्प  परिचय खालील प्रमाणे आहे.

ग्वाल्हेर राज्यात वास्तव्यास  असलेल्या श्रीयुत वामनराव पंतोजी कुटुंबातील ते मधले अपत्य होते. पिढीजात शिक्षकी वृत्ति मध्ये स्वतःला गुंतवून , 30 वर्षे तत्कालीन  ग्वाल्हेर राज्यातील ग्वाल्हेर, उज्जैन , मंदसौर  व  गुणा  ह्या ठिकाणी ते शिक्षक आणि नंतर हेडमास्टर राहिले. वयाच्या पस्तीसाव्या वर्षी अलीगढ मुस्लिम यूनिवर्सिटी येथून प्रायवेट एम ए सुद्धा  केले.

1942 पश्चात सेवानिवृत्ती नंतर शुजालपुर च्या मंडी  समिति हाई स्कूल मध्ये मुख्याध्यापक राहिले. त्यानंतर उज्जैन येथील उद्योजक श्रीमान लालचंद सेठी यांच्या आग्रहास्तव 1947 ते 1974 पर्यन्त इंदूर येथे त्यांचे नगरश्रेष्ठी बंधु श्री भंवरलाल सेठी (मेसर्स बिनोदी राम बालचंद, बँकर्स अँड ट्रेजरार बॉम्बे बरोडा अँड सेंट्रल इंडिया रेल्वे) यांच्या कुटुंबास शिकवण्यासाठी ट्यूटर-गार्डीयन होते.

सदर कृति साधारणपणे १९२८-१९३५ च्या काळात लिहिली गेली आहे.

## प्राक्- कथन

वही क्रमांक तीन मध्ये ७७ कवितांचे संग्रह आहे. वही क्रमांक एक प्रमाणे काही कविता वेगवेगळ्या संमेलनांसाठी आणि समरोपां साठी केल्या आहेत. घरगुती प्रसंगावर बरेचसे काव्य आहेत. राजाश्रयी असल्यामुळे प्रासंगिक काव्य सुद्धा ह्यात आहेत. तत्कालीन राजकीय घडामोडी वर काही सुचलेल्या कविता पण आहेत.

चंद्रयान व मंगल पादाक्रांत करण्याचे उद्दिष्ट माण्डणारे काव्य " मेरुच्या शिखरीं चढेन अथवा चालेन पाण्यावरी " ह्या कवितेत आहे. हे या संग्रहाचे शीर्षक आहे.

खालील तीन काव्यांचे लिखाण एका ठिकाणी नोंद न झाल्याने मला सुचल्या प्रमाणे केले आहे. वाचकांस काही वेगळे बदल हवे असल्यास तसे कळवावे.

34. हा ग्रंथ सुन्दर असे मम जीवनाचा ८४ - ८५ - १०० - १०२
35. ये ऑफिसांतुनि पती थकुनी घराला ८६ - ९३ १३५ - १३९
36. पुत्रजन्म ९४ ते ९७ ९८ १०७ अ - १०९

- १८ मार्च १९३६ ला बॉम्बे क्रोनिकल मधून कळलेल्या बातमी वर परीक्षा हॉल मध्ये लिहिलेली कविता "एक हरिजन मुला चा मृत्यु" , त्या वेळी कवि कुसुमाग्रजांनी सुद्‌धा लिहिली होती.
- २७.१०.१९३४ ल लिहिलेली "महात्म्यांस" नामक कविता पुण्याच्या केसरींत १६.११.१९३४ ला प्रसिद्ध झाली
- वही क्रमांक दोन उपलब्ध नाही.
- वही क्रमांक एक वेगळ्या पुस्तकाकारात या सोबतच प्रकाशित होत आहे .त्यास " रंगवीन वैखरीस, वरद हस्त हा शिरीं" असे शीर्षक दिले आहे.
- हस्तलिखित अनुक्रमणिका सोबत सुरवातीला एक वेगळी टेबल ऑफ कंटेंट क्विक हायपरलिंक युक्त दिली आहे. त्यावर क्लिक करून त्या कंटेंट वर सत्वर वाचता येईल.
- कोष्टकांत खाडाखोड किंवा अस्पष्ट असलेल्या नोंदी आहेत. काही चुका असणे शक्य आहे, त्या अवश्य सूचित करा . त्यावर योग्य ते सोपस्कार करता येतील.

  हुबेहूब वही मध्ये असल्या प्रमाणे पुस्तक केले आहे.

- संपादक

Page 5

अनुक्रमणिका

Page 9



Page 10 Blank

# खण्ड काव्य

## रागावलेली तरुणी

(स्वर-संमोहनं नाम प्रथमः सर्गः)

आन्दोलनास करिती कर पादपांचे।
त्यांचे तसे शरलवे नव पल्लवांचे॥
नैसर्गिक प्रणय भाव निबंधना ते।
जोडीति गुंफुनि करांस करांत नातें॥ १ ॥

कांही तरु पसरती कर कोठे
झेलावया गगन कंदुक गोल मोठ मोठे
झाडें विशाल दिसतात कुठें उभीं तीं
वाटे मनीं बघुनि सादर ज्यांस भीती॥ २ ॥

कोठें कळ्या उघडु लागति पाकळ्यांला।
किंवा फुलें उघाडिती निज लोचनांला॥
आंतून भृंग उडती रस मुग्ध लोभी।
ज्यांचे अहा सहृदयत्व मना विलोभी !॥ ३ ॥

उत्फुल्ल पुष्प हंसती करितात केली ।
आडून ' ता' करिति सुंदर बाल वेली॥
वेली कुणी पदर पल्लव सांवरीती।

Page 12

त्यांची करी तरल वायु पुरी फजीती ॥ ३a ॥

पाहून एक तरुण स्थळ हें निवांत।
पाषाण आसनिं बसे विर पान्तरांत॥
रागावुनि बसतसे हृदयीं अशान्ति।
बाला निसर्ग रमणी रमणीय कान्ति॥ ४ ॥

कीं देवता अभिनवा कुणि वन्य वंद्या।
प्रभातिकी प्रगटली जणुं मूर्त संध्या॥
वाटे कपोल जणुं पुंञ्जित पुत - राग - धारी।
गाणें सुचे मुळि तिला नच रागधारी॥ ५ ॥

चालें किती श्वसन दीर्घ विषाद - सूची।
तोंडीं दिसें हृदय - पुस्तक - भाव - सूची॥
निःस्तब्ध गाल फुगरे वर शून्य दृष्टी।
डोळे नितान्त करितात स्फुलिङ्ग वृष्टी॥ ६ ॥

रागावली बघुनि हो नव सृष्टि मूर्ति।
कोठें करांस तरु जोडिति नम्रमूर्ति॥

Page 13

संताप मानस तिचा जणुं घालवाया।
शाखा सुशीतल शिरीं पसरीति छाया॥ ७ ॥

पुष्पाञ्जली तिज समर्पित ते  करीती ।
व्हाया प्रसन्न सुरु यत्न अनेक रीती ॥
भालावरी लवत पाचु समान पान ।
माना असे बिजवरा हिरवा लहान ॥ ८ ॥
हाले हळूं तरू करीं मृदुपर्ण पंखा ।
पक्षी समोर  उडती हलवीति पंखां ॥
लागे फिरू विहग - मंडळ मंडळांत ।
चाले विहार गगनाङ्गण मंडळांत ॥ ९ ॥

कोणी करीति खग मंजुल कूजनातें ।
लाडावती इतर बागडुं लागतीं तें ॥
खाई रसाल रस मंजरि; गीत गाई ।
ही कोकिला जणु म्हणे' हंस गोड आई ॥ १० ॥

डोक्यावरी चमर चामर हालवीती ।
धांवून धेनु बघती लवतीं न पातीं ॥
Page 14
निस्तब्ध कोणि मृग -   शावक पाहताती ।
रागावली  जननि ते चुप राहताती ॥ ११ ॥

कोणी मृगी मृग किशोर समोर मोर ।
नेत्रास नांचविति ; नाचति सानं  थोर ॥

हाले शिखण्ड पसरी सगळा पिसारा ।
सारा तिला  हंसविण्या वनिचा पसारा ॥ १२ ॥

वाहे समीर किति -मंद नभो विहारी ।
आणून वारिकण सोडत ताप हारी ॥
वंशीं भरे श्रवण रंघ्रपथांत गोड ।
त्याला न कृत्रिम जगांत मुळीच जोड॥ १३ ॥

हाले समग्र जणु काय वनांतरङ्ग! ।
निर्जीव वस्तु मनि ही उठती तरङ्ग ॥
होते सरोवर तिथें जवळी ; तिला ही ।
पाही तरङ्गित मने सुमलोचनाहीं ॥ १४ ॥

सारी वनीं जरि झटे अशि बाल सेना ।
तत्तामसी हृदयवृत्ति मुळीं ढळे ना ॥
Page 15
विस्फारिले नयन तीस तरी दिसेना ।
पाषाणमूर्ति अचला सम तीस माना ॥ १५ ॥

वेलीतुनी हळुहळू  ध्वनि कर्णरंघ्रीं ।
आला; वदे जणुं खरोखरिची पुरंध्री ॥
वारे वेली तिरस्कारिणि आड लपून कोणी ।
वाटे युवा युवति वा वदतात वाणी ॥ १६ ॥

कुंजा मधें प्रथम गुंजन चाललेसें।
वट कुणीतरि पुढें मग बोललें  सें॥
झाली परिस्फुट गिरा मग मानवीती।
तद्भावशून्य हृदयेस न ऐकु येती॥ १७॥

' थट्टा तुला किति हवी तरि ही कराया।
रागावल्या न वहिनी किति भाऊराया !!! ॥
" तूं थांब मी करिन मौज अणीक ताई "।
आलाप बासुरि वरी मग गोड गाई॥ १८॥

संगीत नाद - लहरी भरल्या वनांत।
Page 16
वाऱ्यावरी पसरल्या लहरी भरल्या मनांत॥
निस्तब्ध धेनु वळल्या वळले कुरंगं  ॥
तीच्याहि शून्य हृदयीं स्फुरले तरंग॥ १९॥

नाचीतसे सकल सुंदरता वनाची।
झाली सचेतन तनू जड भावनांची॥
तो वाजवीत सुटला हृदयांत राग।
ज्याच्या पुढे पळति सर्व विराग राग॥२०॥

त्या सारख्या निघति निर्मल गीत धारा।

वर्षाव होत श्रवणांतुनि आंत सारा ॥
झाली तरङ्गत संकुले वृत्ति तीची ।
सद्भाव पूर्ण अनुरागती सतीची ॥ २१ ॥

वाटे कोणि महान निपुण मांत्रिक भाव गीत ।
बालेस तेथ बसल्या स्थळि डोलवीत ॥
किंवा अहा सुरसरी सम  बासुरीती ।
चित्तांत ती प्रगटवीत * रस प्रतीती ॥ २२ ॥  *रस= (१) अमृत ( २ ) प्रेम.


चित्रांत आलाप गुंजन निगूढ गुहेंत झालें ।
' हे तेच ते ' नकळतां ध्वनि हे निघाले ॥
झण्  झण् झणत्कृति सुरु हृदयांत झाली ।
वेगें  तडित ( गोपी जणुं ) तडक ती तिकडे निघाली ॥ २३ ॥

घाईंत केंस सुटले सुमनें गळालि ।
कांहीं बटा पसरल्या कुरळया कपाळीं ॥
झालें कचावरण  रम्य कुचांत तीच्या ।
मागें हि आज घन ते रुळती सतीच्या ॥ २४ ॥

जेव्हां अशी विखुरली तवमेघमाला ।
शोभा अपूर्व दिसली कविच्यामनाला ॥
झांकी कधीं जलद जाल शशीमुखाला ।

सारीं करें कधिं सुधांशु घनावलीला ॥२५॥

दोघांत दौड जशि चालत अंतराळीं ।
प्रत्यक्ष भूवरि तशी दिसली निराळी ॥
वाऱ्यांत गीत लहरीतिल प्रेरणा ती ।
संचालना हृदयिं देत अनेक रीती ॥२६॥

अंगात संचरतसे जणु काय वारे ।
चाले तशी त्वरित मोहक हाव सारे ॥
होता जिथे परम मंगल गीत नाद ।
ती थेट जाय दुसरा तिसरा न नाद ॥२७॥

तेथें पुन्हां विसरली मग देहभान |
निर्वात निश्चलित ज्योतिसमान मान ॥
एकाग्रता पुनरपि प्रगटे तिच्यांत ।
उद्भूत होत पण सात्विक भावनांत ॥२८॥

ठेवूनती हनुवटी वर तर्जनीला ।
राही उभी करूनि लाम्ब करांगलीला ॥
ती वाक्स्तंभिता वचन कांहि मुळीं न बोले॥
ती पापण्या वर करी फिरवीत डोळे ।
होऊन तन्मयमनीं नुसतीच डोले ॥२९॥

तोंडास ती फिरवुनी मग चालु लागे।
वंशींत गीत भरती बघतो न मागे॥
मुग्धा जशी  विवश गाय वनीं कुरंगी।
ती लुब्ध जाय तशी मुग्ध निजांतरंगीं॥३०॥

ज्याला कळे परम उत्कटता मनाची।
ज्याला कळे प्रबलता नव भावनांची॥
कां लाट उंच उसळे कळतें ज्याला।
आकर्षणांतिल रहस्य कळे तयाला॥३१॥

Page 18
तेजस्वी तारक नभांतील सर्व तारे।
आकर्षणीं अखिल हे स्थिर विश्व सारे॥
बांधती प्रेम सगळ्या स्थिर जंगमाला।
ज्याला कळेल, सकळ हेच, कळेल त्याला॥३२॥

ओढी शशीस शिशुवत् जननी घराही।
(आई बरोबर सभोंवति बाळ (चंद्र) राही)
तो सारखा फिरत बाळ मुळीं न राही॥
पाहून पूर्ण हंसऱ्या वदना शशीच्या॥
हृत्सागरीं प्रगटतें भरतें धरेच्या ॥३३॥

धांवे धरा करित प्रेमळ सांवलीला।

अत्यंत ये कळवळा जणु माउलीला ॥
राही मधोमध उभी ती शिशुच्या रविच्या ।
लागो न ताप तशि दृष्ट मुखा शशिच्या ॥३३(अ)॥

होतो कसा जलद दूत हि मानवाचा ।
होतो कशी प्रगट वल्लर वृक्ष वाचा ।
ओढे नद्या विहग वृंद हि गोड भाषा ।
बोलूनि अर्पिति कधीं हृद्याभिलाषा ॥३४॥

हे कां , कसे, कधिं घडे कळले जयाला ।
सारे कथानक रहस्य कळेल त्याला ।
(जीं पुसां मजु हो सगळे तयाला??)
तर्का अगम्य कविसृष्टि सुभावरम्य ।
(शंकां कुतर्क किति सृष्टित नाहिं क्षम्य)
येथें हवें हृदय निर्मल भावुक पूर्ण शुद्ध सम ॥

Page 19

छाये परी अनुसरे मग येत भानीं ।
संमोहनी पतिकला मगयेत ध्यानीं ॥
हृदय संतापवी अवनिला मग दावि माया
सोडी सरी वर सरी रवि शांत व्हाया ॥ ३६ ॥

भानू सुधारस असा वसुधेस पाजी ।
होती प्रफुल्ल धरणी तनु रोम राजी ॥

तैसेच नाथ करि , धन्य म्हणे प्रभू मी ।
झाली तिची पुलकिता अति नव भाव भूमी ॥ ३७ ॥

भावांस जी हृदयिंच्या हृदयांत ओती ।
वंशी दिसे मधुर माध्यमांशी अहो ती ॥
मुग्धेस ने जशि सखी  प्रिय संनिधिनी ।
ने तशी करूनि मोहित तीस गानीं ॥

Page 20

भानी मनांस वळवी कृत कृत्य झाली ।
वंशी रस प्रवण त्यांस करून घाली ॥
त्यांना हळूच चुपचाप घरांत सोडी ।
संधान तंतुसि सुकोमल भाव जोडी ॥३९॥

वंशी जशी विरत होय मुकी न वाजे ।
वंसें तशा निसटल्या नच पाय न वाजे ॥
निःशंक चित्रनयनें बघतात भिंती ।
एकान्त भङ्गिति न त्या; पसरे प्रशान्ती ॥४०॥

झाले उभे उभय सन्मुख प्रेम भाव मूर्ती ।
अन्योन्य बिंबित मनोमुकुरांत  होती ॥
दोघे हि शान्त जणुं काय जुने अबोले ॥
पण संघर्ष चालत अगोदर कोण बोले ॥ ४१ ॥

येथें चळे डळमळे दृढ़ धैर्य मेरु ।
हा बापुडा युवति निर्बल काय भीरू ॥
मुद्दाम चंद्रबळ ओढुन आणलेलें ।
तैसे लयास उसने अवसान गेलें ॥ ४२ ॥


चित्तांतुनी स्फुरण किरण दिव्य नवे निघाले ।
संकेत संकुचित नेत्र नवीन बोले ॥
अज्ञात वाजत मनीं मृदु मूक वंशीं ।
झाल्या पुन्हां पुलकिता तनु सर्व अंशीं ॥ ४३ ॥

' कां राग हा!' झरझरे प्रतिभाव गंगा ।
प्रत्युत्तरीं कुटिल ती करि नेत्र भंगा ॥
ती लागली चढीव ज्या किति कैक हल्ले ।
काबीज होती दृढ कोट अभेद्य किल्ले ॥ ४४ ॥

अंगीं अनंग भरला जणुं होय सांग ।
"कां राग हा ‘‘,पुसत साग्रह " सांग, सांग" ॥
जेव्हां नवा तरल ओसरला तरंग ।
संभाषणोन्मुख दिसे तया विमलांतरंग ॥ ४५ ॥

झंकार होय  जणुं पैंजण किङ्किणीची ।
वाणी किङ किङ निघे रव मनोहर पद्मिनीची ॥

नेत्रांस ती उडवुनी प्रणयें म्हणाली ।
बाई, खरोखर अतां तरि शर्थ झाली ॥ ४६ ॥

कोणी म्हणेल मजला किति कर्कशा ही ।
भोळ्या शिवा न शिवतो पण दोष कांहीं ॥



सारें करून करिं काहिंन दाखवाया ।
होई अलिप्त पसरून नवी न माया ॥ ४७ ॥

माझीं कुठें मुळि असे  इकडे कां पर्वा ।
नाहीं तरी तुम्हि कुणि असें करितां न पर्वां ॥
वंन्से तशा जवळच्यात् म्हणतात काकू ।
आतां कशांस करितां कथण्यास कांकूं॥४८ ॥

' तूं काय हें म्हणशि येत न कांहीं ध्यानी' ।
सांगे हळूच पतिच्या अवनत कांनी ॥
थोडें  हंसून वदला ' अगं हें खरें च  ! ।
एकीस दोन असल्या म्हणजे बरेंच !!! ॥ ४९ ॥

वाटे पडे तनु वरी अशतीवरूनी ( ? )
पेटे तिच्या मृदु मनी
ग मत्सराग्नी ज्वालानभो हृद्य व्यापुनी
उंच गेली आली

जणुं  झळि मुळें नयनात लाली ॥ ४९ अ॥

झालें प्रकम्पन पुन्हां हृदयात चाले ।
संक्षुब्ध मानस तरंग हि उंच गेले ॥
आरक्त नेत्र भिवया वर ताणलेल्या ।
त्यांतून मौक्तिक स्त्ररीत तुटल्या गळाल्या॥

तीं लागलीं गरागरा बुबुळें फिराया ।
स्वामीच्या मनास चहुं बाजुनि कीं पहाया ॥
लागे न थांग तिजला कळती न कावे ।
खाई तिचें मन पुन्हां मग हेलकावे ॥ ५१ ॥

Page 23
रागें दिसे अरुण कांति विकास वक्रीं ।
वाटे उषे परि खुले नवरत्न वस्त्रीं ॥
कान्ता जरी कुपित तीव्र कटाक्ष सोडी ।
उत्पन्न कान्त मनिं होय अपूर्व गोडी ॥ ५२ ॥

बोंलें अनेक असती सवती सतीत्या ।
हेती पतीस घरिं ( गृहिं ) सौख्य अनेक रीत्या ॥
सख्या जणूं बहिणि नांदति कीं सख्या त्या ।
त्या निंदिती न पतिला न पित्या विधात्या ॥ ५३ ॥

आहे विचित्र परिरीति तुझी अनिष्टा ।
तू ज्येष्ठ होशि अग होईल ती कनिष्ठा ॥
वाया मना शिणविशी तशि चारू काया ।
तूं व्यर्थ आचंवु नकोस प्रिये सुखाया ॥ ५४ ॥

( सेवील ती तुज नको शिणवू स्वकाया
वाया न आंचउ प्रिये मिळत्या सुखाया )



मानेस देत हिसका मग कंठ दाटे ।
बोले" प्रिये', तिज म्हणा प्रिय जीच वाटे ॥

आडून मी  बघितलें तिज पाठमोरी ।
आणून गुप्त हृदयांत घरांत तीला
सांगा कुठे लपविलें कवटाळिनीला
माझ्या घरांत अश काय म्हणून येती ॥ ५५ ॥

प्रत्यक्ष तें !! मग कशास हवें प्रमाण ।
वेडी मला समजतां अगदीं अजाण ॥
हो, हो, खरेच असशी अगं शुद्ध वेडी ।
प्रेमें प्रियेस मगनाथ माग ओढीं ॥ ५६ ॥

त्यानं सारा हळूच पडदा वर उंच केला ।
सारा प्रकार मग लक्ख मनांत झाला ॥

मेणाचि तीस पुतळी   दिसली सुरेख ।
जीच्या मुखी ठळक सुंदर भावलेख ॥५८ ॥

अत्यंत उल्लसित लोचन होय दारा ।
प्रेमें उभी बघत कपट नाटक सूत्र धारा ॥
बोलें अशी लुसलुशीत मऊ असून ही चित्तीं
चित्तीं सुरी परिकठोर हंसे वरून बाई किती
टवळीने छळलें मला हें बोलो खुशाल
कुणी यांत न जीव आहे ॥ ५९ ॥

माझे कळे  मज, कसें मज होउ लागें ।
माझी कुणा उडविण्या टर काय लागे
भोळीच मी हो फसविण्या किति वेळ लागे
झाल्या अपांग अवलोकनिं दंगदृष्टी ।
झाली तिथे अमृतगर्भित भाववृष्टी
बोल हंसून म्हटली म्हण सार्थ झाली
मेणाचिही ही सवत बाई  नकोच मेली ॥ ६१ ॥

Page 25

शेजारच्या प्रगटल्या मग तेथ काकू |
त्यांना स्वहास्यलहरी नच  येति झांकू ॥
सानंद नेत्र  मिचकावि नणंद आली ।
ती वहिनी पदि  लीन झाली ॥ ६२ ॥

हळु हळु अगदीं हा स्फोट झाला कटाच्या
हळु हळु सरला हा अंक ह्या नाटकाचा ॥
हळु हळु तरणी चां राग जाई लयाला
हळु हळु पउराही रात्रिंचा खाली आला ॥ ६३ ॥

बड बड मग चाले ताल ना तंत्र ज्याला
खिल  खिल  ध्वनि मध्ये सर्व वृत्ती बुडाल्या
गुलु गुलु   गुल  गोष्टी चालल्या प्रेमधामीं
सर सर शर नेत्रीं चालले शीघ्रगामी
मृदुल कमल कोशी रम्य किंजल्क वेधीं
मधुर मधु रसाच्या होउनी गुंग गंधीं ॥
कमलिनी मंचकी भृंगभृंगी ।
डुल डुल डुलताती रंगुनी अंतरंगीं ॥ ६४ ॥

Page 26

सर्ग २

## प्रभात - प्रसंग

अनंत - हस्तें निजतेजमाला ।
सहस्रश्मी उधळीत आला ॥
सारे मनोमंदिर भावनांचें ।
झाले प्रभासयुत पावनांचे ॥ १ ॥

कोणी प्रभु च्या भजनात गुंग ।

कोणी चहा बिस्किट पान दंग ॥
कोठे जिभा चालीत सासवांच्या ।
तैं आसवांच्या सरिता सुनांच्या ॥

कोणी म्हणे वृद्ध  ' हरे मुरारे' ।
देवां असा तूं निजलास कारे ॥
येई मला झोंप न वेदनांनी
प्रसन्न हो दीनानिवेदनांनी ।
तूं ऊठ देवा उठवी मलाही ॥
ने आपल्या संनिध ऐक कांहीं ॥

हा क्षीण झाला पिंजरा जरेने ।
दारे दहा ही झिजलीं क्रमानें ॥
ना सांपडे वाट तरी उडाया ।
हा घाबरे पोपट उंच जायया ॥
निद्रेंत जी सृष्टि दिसे विलीन ।
तीच्यांत चैतन्य शिरे नवीन ॥
चेंडू जणूं ती खगवृन्द रूप ।
फेंकी वरी खेळत खेळ खूप ॥ २ ॥

खेळे कळ्यांशी हंसऱ्या फुलांशीं ।
सकाळिं आनंदित कोकिलांशी
झाला पुरे खेळ सलज्ज बाला ।

प्रेमें म्हणे ' काय करावं याला ' ॥
आश्लेष कंठांतिल स सैल झाले
' सोडा अतां कोकिल कण्ठ बोले ॥ ३ ॥

' पाहील कोणी नं ?' सकाळ झालीं ।
जागि दिसे आपली सर्व आळी ॥
अत्यन्त जों उत्सुक होय जाया ।
जाया तिचें यत्न हि जाति वाया ॥ ४ ॥

तीं नेत्र ताणी भिवया तशा ही ।
कांहीं सुचेना टक लावि पाही ॥
जा जा बोलें ' बरें जा , हसुनी म्हणाली ।
( चाले अशी सुंदर देव घेव )
घेईन व्याजासह वेळिं (प्रेम) ठेव मुद्दलाला

हा ताप आंतून जिवास जाळीं ।
हा खोकला दावि कला निराळी ॥
प्राणास न्याया नवि काढि रीत ।
टांकी घशा ( गळया ) आंत सुरु करीत ॥

हा श्वास टाकी जणुं लांब पाय ।
मागें न येवो ; पण येत हाय ! ॥
नाकांतली तों करि साफ वाट ।

रोकी गळयातला कफ किन्तु दाट ॥

अंगीं कळा कीं चमका निघाल्या ।
तारा शरीरीं जणु चालु झाल्या ।
बोलाविते रात्रिं यमास मी ।
येतो न  तो काय करू प्रभु मी ॥
(होती जणुं)

होतात कीं पातळ अंतदाह
नाड्यांतुनि वाहति हे प्रवाह
साऱ्या शरीरांत सरासराहे '
व्यापून केन्द्रीं स्थिर दुःख राहे
रागें करूनी झिडकारूनी ती ।
पत्नी पळाली; पति खिन्न चित्तीं ॥ ५ ॥

च्यां प्यां ध्वनी होय घरांघरांत ।
च्यूं च्यूं हि चाले' तरु कोटरांत ॥
वत्सांस मांडीवरि घेति आई ।
गोठ्यांत पाजीति प्रफुल्ल गाई ॥ ६ ॥
घेऊन डोक्यावर घागरींना ।
कडेवरी घेति मुलामुलींना
मार्गांत रांगा गजगामिनींच्या
पाण्यास जाती किति कामिनीच्या ॥ ७ ॥

त्या संकटातुन सुटावयाला
 ती हांक मारीति निज बालका ला
जागे तिचे तें मग बाळ जागें झालें
शाबास बाळा बघ थांब आले

माझे पहा छोनुकलें शहाणें ।
लागे म्हणाया मग गोड गाणें
शिशुस घेऊन हंसून दारा
दारांतुनी सोडि कटाक्ष धारा

दुरुन बोले मिचकावि डोळे
भोळे तुमि हो किति शुद्ध भोळे
हा बाळ राया मज सोडवाया
तयार आहे तरि या धराया
बोले अहाहा येतां कसे मी म्हणते पहाते

धेनू चरायास मग जाति रानी
काढावया केर स्वतां घरात
घेती कुणी केरसुणी करांत
Page 27
गोष्टि किती चालति चालतांना
सीमा न त्यांच्या मुळिं भाषणांना
आडावरी गोळसभा (राउंड ) करे ती

पंचायती सर्व सभेत होती
 तेथेंच स्वातंत्र्य कुरापातिनां लागे पुसावे न मुळीं पतींना

वाद  विवादावर हातवारे
पट्टे मुखाचे सुटतात सारे
भांड्यास भांडें मग लागु लागे
भांडावया वेळ स्त्रियांस न लागे

पाणी विहीरींतुन काढतांना
डोळयांत आले मग भांडतांना
पुन्हां पुन्हां नेत्र भरून येती
कुंभावरी कुंभ भरून घेती

जाती कधीं कुंभ - पयोद - वरून  हाले
पाणी पडे होय शरीर चिंब ओलें
कीं हा वाटे अकस्मात घनकृष्ण आला
धरा पाझरीत त्याला

हळू हळू थेंबे वरून टाकी
पाणी नदीच्या उडवीं तटाकीं
पाऊस झिम् झिम् पडतो वरून
पृथ्वी तनू भाग दीसे खुलुन
वस्त्रांत  तिच्या हिरव्या तृणाच्या

पाणी जिरे आंतुन धराधरांच्या
समुन्नतांगी कुच कुंभिनींच्या
विशेषकर रम्य रम्य नितंबिनीच्या

Page 28

शरीरभूमी  वरची अशेषा
तशी दिसे सुंदर रूपरेषा
शरीरयष्टि युवती जनांची
बारीक ही सिंह कटी तयांची

त्यांचा चुको तोल न कीं म्हणूनी
हीं पारडीं बाजुस तुल्य दोन्हीं?

Page 29
Blank
Loose sheet

# मंदाकिनी जन्म

21.10.1939

कमल कृष्णा प्रभा कन्याः इन्दुर्मन्दाकिनी तथा।

रामकन्यां स्मरेन्नित्यं महत्पातक नाशनम्॥  राम

Page 30
29.01.1934

# करूण विलाप

नाहीं देवा अजुनि महिना एक ही हाय झाला
तोहा आला कुठुनि न कळे घातकी घोर घाला
ग्वाल्हेरीच्या मृदुल हृदया आंतल्या या निधाना
नेलें दैवा, परम अधमा नीचकर्त प्रधाना

नाहीं कीरे अज्ञानि पुरत्या काढिलें मोडवाला
किंवा नाहीं हळद सुरली लागली जी वधूला।
नाहीं किंवा अजुनि विझल्या हांसऱ्या दीपमाला
तो त्या हास्या मधुनि स्फुरल्या ध्वंसिली क्रूरज्वाला

नाहीं वातावरणिं विरल्या मंगला गीत  गातानां
तों आक्रोशें गगन भरले फाटलें सांगतांना
आलें येथें कुठुनि कुठुनी पाहुणे या विवाहा
जाती  आती विकल सगळे तें स्मशानास  हा! हा ! ।

केली दैवें हरहर कशी क्रूरताही अवेळीं
झंझावातें अहह पडली खालती बालवेली
किँवा गेली परम रुचिरां बल नौका तळाला
बालज्योति विझुनि अथवा जाय कैशी लयाला

Page 31

प्रातःकाळीं नलिनिनयनें जो न पावे विकासा
तों हा काळा करि विज कसा नेतसे या विनाशा

गेली अस्ता अभिनव नव्या जीवनाची प्रभात

हर्षाश्रूच्या मिळति सरिता विव्हला सागरांत (मानसांत )

झालें कैसें उलट सगळे एक नेत्रें हंसावें

एका एकीं द्वितीय नयनें त्याचवेळीं रडावें

मांगल्याची लहुन नुकती अष्टकें लेखनीनें

कैशी आतां परत लिहुं मी शोकगीतेंच त्येनें

होत ऐसे ग्रह शुभ कसे चांगला वा मुहूर्त

एका वेळीं उदयलय ही पावली सर्व आशा

अंतःसृष्टी भर पसरली दाट आता निराशा

जेथें येता किमपि करिता काय तेथे करावे

अश्रूंचे हें पटल पसरे कोणि कोणा पहावें

शोकामध्यें बुडति सगळे कोणि कोणा धरावें

कोणी कोणा निजजड़ मुखें केंवि हो सांत्ववावें

29.03.1934

Comment: Referring to untimely demise of Princess Kamalaraje soon after her marriage. Incident at Akkalkot, she got her ribs broken and it punctured her lungs. She was herself driving a car.

Extract from internet website

1923 - 1952 Meherban Shrimant Raja Vijayasinhrao Fatehsinhrao Raje Bhonsle, Raja of Akalkot. b. at the Rajwada, Akalkot, 13th December 1915, eldest son of Captain Meherban Shrimant Raja Fatehsinhrao III Shahaji Raje Bhonsle, Raja of Akalkot, by his first wife, Shrimant Akhand Soubhagyavati Rani Tarabai Raje Bhonsle, KIH, sometime Regent of Akalkot, educ. Rajkumar Coll., Rajkot, Bishop Cotton High Sch. and Deccan Coll., Poona . Succeeded on the death of his father, 3rd April 1923. Ascended the gadi 4th April 1923 and reigned under the Regency of his mother until he came of age. Invested with full ruling powers 27th February 1936. Signed the instrument of accession to the Dominion of India, August 1947. Merged his state into Bombay 8th March 1948. Rcvd: Silver Jubilee (1935), Coron. (1937), and Indian Independence (1947) medals. m. (first) at Gwalior, 23rd February 1934, Shrimant Akhand Soubhagyavati Rani Shanta Raje Sahib Bhonsle (b. at Gwalior, 14th November 1914; d.s.p. at Bombay, from a pierced lung received in a freak motor accident caused by a whirlwind near Akalkot, 19th March 1934), née Maharajkumari Shrimant Mary Kamlabai Raje Scindia, only daughter of Lieutenant-General H.H. Ali Jah, Umdat ul-Umara, Hisam us-Sultanat, Mukhtar ul-Mulk, Azim ul-Iqtidar, Rafi-us-Shan, Wala Shikoh, Muhtasham-i-Dauran, Maharajadhiraj Maharaja Shrimant Sir Madho Rao Scindia Bahadur, Srinath, Mansur-i-Zaman, Fidvi-i-Hazrat-i-Malik-i-Mua'zzam, Rafi-ud-Darja-i-Inglistan, Maharaja Scindia of Gwalior, GCSI, GCVO, GBE, KIH, by his second wife, H.H. Shrimant Akhand Soubhagyavati Maharani Gajrabai Raje Sahib Scindia, sometime Regent of Gwalior, daughter of Sardar Baba Sahib Vithalrao Rane, Sar Desai of Sankli, in Goa.

## (उलटी) बालभाव

तूं मालिशी उगिच घेशि हि गालगुच्चे
आई, मला म्हणशि कांग ' लबाल लुच्चे'
दादाचिया जवळ जेविन मी निजेन
तुझ्या म मी जवळ येऊन ही बसेन
(येईन मी न तुज संनिध ना बसेन)
ती देवता पुतळि मंदिर वा खऱ्या चें
ती चंद्र कोर करि सेवन कोंपऱ्यांचे
कांहि क्षणे हि नसतील परन्तु गेली
तो घाबऱ्या जननि सत्त्वर आंत गेली
का ना कळे मळमळे उलट्या हि झाल्या
धांवून अन्य तनया तिजपाशी आल्या
पाठीवरी फिरविती कर कोंवळे तें
त्यांतून कीं अमृत वाटतसे गळेंतें
आणी लवंग कुणि पेपरमिंट आणी
आणी करांजलिंत बाळ सुपारि कोणी
छायेंत बाल लतिका कर पल्लवाच्या
झाल्या झड़ी सुरु सुधारस सिंचनाच्या

Page 33

. काही बरें जननिला मग वाटुं लागे
तों कोपऱ्यांत निजलें मन होय जागें
(तो सुप्त भाव शिशुच्या मनिं होति जागे)
तैं होय एक उलटी जणुं जीव जाई

आई कडे वळलि सत्त्वर इंदुताई

झाला तिच्या खळबळाट मनांत जेव्हां

चोळावया सकर होय तयार तेव्हां

खालीवर फिरवि जादुगिरी चा हात

संजीविनी वटि महौषधि जादुज्यांत

कर्पूर चंदन पराग सुशीतलाङ्गी

ती लेप शीतल करें करिं अंतरङ्गी

पाही वळून जननी मुख गोड बाला

गेला तिचा परतुनि जणुं जीव आला

घाली गळयांत मिठिती अति घट्ट बाला

ती शोभली जननि कंठिं लहान माळा

Page 34

दोघांचिया हृदयिं प्रेम झरे निघाले ।

त्यांच्यांत राग , मन, रोग अहा बुडाले ॥

—--------

Page 35

# भावाञ्जली

**( श्री खासे साहेब ( Shrmant Sadashiv Rao Pawar , Maharaj Dewas Jr. ) महाराजास समर्पण करण्यास लिहिलेली date 07.04.1934 )**

झाला आपण भूप ऐकुनि फुटे वाचा मुक्या मन्मना

एकाएकिं तरङग उंच उसळे संचारल्या भावना

जीं सर्वस्व अकिंचनास अ शिं ही मोत्यापरी आंसवें

हर्षोत्फुल्ल विलोचनीं विलसलीं शब्दौघ त्यांच्या सवें ॥ १ ॥

अंतः प्रेरक आंतुनी मज कुणी सांगे ' कसें ही लिही
भक्ती च्या वचनीं रस प्रगटतो ' तूं मान लोकोक्त ही
श्रद्धा भक्ति समन्विता म्हणुनि ही भावांजली घ्यानृपा ।
ठेवावी गरिबावरी विकसित प्रासादिकी सत्कृपा ॥ २ ॥
युष्मत्कीर्ति - सरित्प्रवाह पसरो गङ्गे परी निर्मल
कांठाची तरुराजि जीवन नवें पावो सदा उज्जवल
होवों मंगल उत्सव प्रतिदिनीं देवास देवस्थलीं
होवो भूपतिची प्रजा प्रभुरिता उत्फुल्ल रोमावली ॥ ३ ॥
वाटे कीं झरते सुधामधुरता धारा किती भाषणीं
तेजस्वी अतिसुंदराकृति उभा आजानुबाहू कुणी
ज्याचा दिव्यमहानुभाव महिमा श्रीमान् असा भूपती
आहे कोण ? विचारतांच वळती डोळे नृपांच्या प्रती ॥ ४ ॥

Page 36

ज्याची सुन्दर डौलदार गतिही ऐरावता लाजवी
बुद्रीच्या विभवे गुरुहि दिपती स्वर्गीय लाजे कवी
ऐसा हा नरनाथ येथ प्रगटे देवास चा भूपती
नांदो येथ सदा सदाशिव तशी राज्ञी सती पार्वती॥ ५ ॥
देवा, दे सदया सदाशिव नृपा अरोग्य दे संपदा
पावो सद्गुण मंडनें स्वविभवें अत्युन्नता सत्पदा
वात्सल्यें पितृतुल्य पालन करो राखो प्रजेच्या सुखा
पाहो प्रेम भरे प्रसन्त नयनें तत्क्रीडना कौतुका ॥ ६ ॥

—-----

Page 37

# राज्यारोहण

**(19.05.1934 ला होणाऱ्या राज्यारोहणा करितां लिहून पाठविली श्री खासे साहेब )**

ग्वाल्हेरीच्या विराटा निजमति विभवें तोषवी माधवेंद्रा
झाला मंत्री नृपाच्या गृहपति पदवी भूषवी या क्षितीन्द्रा
झाला अज्ञातवासी त्यजुनि निजपुरी धर्मराजा परी हा
देवासाला स्वतांच्या घरिं परत खऱ्या नाथ येई अहाहा
॥

होतां इर जरी तरी सतत ही देवासची माय भू
प्रेमें पाहत होति कौतुक करें नेत्रें तुम्हाला प्रभू
आईची पडतांच हांक श्रवणी आला असा धावुनी
प्रेमाचे अतिसूक्ष्म तंतु महिपा आणिति आकर्षुनी
' आहे हे घर आपलें' म्हणतसों अभ्यागता आपण
कोणी काय कधी धन्यास करितें त्याचें तया अर्पण
ज्याचें जें जगिं त्यास  तेंच मिळतें कांहीं नको साधन
हक्कानेंच  निसर्गतः वनिं मिळे सिंहास सिंहासन ॥
आहो आपण एक भिन्न शरिरें देवासची लेकरें
सूत्रीं एक प्रजामनें नृप नरा गुंफा स्वतांच्या करें
न्या मार्गें शकरास सूत्र करिं घ्या न्यायांत मर्यादित
होवो शासन काल हा नृपतिचा . सौवर्ण लिखाङ्कित

Page 38

आला हा उद्याचलावर रवी आरूढ सिंहासनी
केतू धूलि घनावली पटल ही झांको न तेजा कुणा
वाढो तेज नभांत कांति पसरो व्यापो जगन्मंडला
व्यापो भूपति कीर्ती कांति विमला होवो ( जगन्मंगला)

पृथ्वी संयमतां  समुन्नत पदं भू पाय हैमोगिरी :
गांभीर्यं जलधि बलेंच पवन श्चंड प्रताप यशः
भास्वान्नर्पयतां मति प्रखरतां नेत्र द्युतिं वर्धयन्
चंद्र श्वेतासि चंद्रिकांच वितरत्वाह्लादिनीं संपदम्

—----
Page 39

## मुलांस भरवत सुटणाऱ्या आईस उद्देशून

भरव भरव बाळा पोट त्याचें दुखू दे
टरबुज उलुंदे हे ब्लॅडराला फुटू दे
किति तरि बघ कप्पे !!! पोट आहे अफाट
भर सकल कपाटा आंत तूं पोटांत दाट ॥
अग भरव करंज्या लाडु जिलब्या क्रमाने
जगति उगिंच घ्यावा का जन्म या मुलाने ?
नर घरिं भरलेल्या लाभला जन्म बाळा
दिवसभर भरावें तीनशे साठ वेळा
दिवस खरंच आहे खावयाचे मुलाचे
रजनि तरि कुणाचे ! चालु हे काम त्याचे
फुकट सकल जातो रात्रिं चा सर्व वेळ
उठव, म्हण मुलाला ' दोन घें घास बाळा
आहे तसें पहिलवान् बघ मूल तुझें
झेंपेल जेवण दहामण त्यास ओझें

होतें असें खवट आंबट तोंड खातां
त्याचें तसे मुख मलूल दिसे पहातां

Page 40

त्याच्यांत काटकपणा बळ वाढवाया
कोणी कसा म्हणुं शके तवयत्न वाया ?
तरिपण मज वाटे मानसीं फार भीती !!
अग, जगिं जगण्याला जेवणीं ठेव प्रीती ।
म्हणति सुजन तारी अन्न तैसेच मारी ।
पण तव कर कांते कोण धैर्य निवारी ॥
किड किडित मुलाचे पाय; पाया रिकेटी ( rickety /malnourished )
वर तदुदर डेरा घुम्मटा कार पोटीं
बघ लुकलुकणाऱ्या मंदिरा ; खांब खाली ;
कळस न वदनाचा ढांसळो हा अकाळीं
वर सरळ रुळाच्या सोडली रेलगाडी
पण जर असला हा हांकणारा अनाडी
उगिचच भरू लागे कोळसां इंजिनात
करिलच तुकडे तो कोंडतां वाफ आत
उठुनि चिडुनि बोले धांवली माय खाया
उसळुनि हिसक्याने मान लागे दुखाया
म्हणत कळस झाला तोंडि घाला लगाम
झुकवुनि शिरे खा लीं बाप राम पवि विराम
खंबीर बाप जरि ; खुंटलि धीर वाणी
पाही हळु च वर तो अतिदीन वाणी

Page 41

# एक आकांक्षा

झाला भव्य महाल; जाय विलया तें पूर्वि चें झोंपडे
गेलें तें छत चंद्रमौळि तुळया तें खांब ही वांकडे
खेळे वीज घरांत येउतरूनी स्वर्गातुनीं खालती
दासीच्या परि हात जोडुनि पुसे ' आज्ञा मला काय ती '! ॥ १ ॥

पाण्याला भरण्या जणूं वरुण ही हातात घेतो घडे
उद्यानींस जलसिंचना करितसें ( छिडकाविती )  या भव्य वाड्यापुढें
नानारम्यविहार कुंज रचने माझ्या मनोरंजना
वाटे मी जगिं धन्य, रम्य स्फुरल्या सौख्याचिया कल्पना ॥ २ ॥

अग्न सत्वर घेउनी रथ उभा माझ्यापुढें दास सा
काढी चित्र मला हवें शवि तसें आज्ञेंत वागे कसा ॥
वायू गांउनि गोडगीत करितो माझे मनोरंजन ।
नेई उंच  मला विहार करवी खांद्यावरी वाहुन ॥ ३ ॥

Page 42

मिष्टान्नें रोज भिन्न रुचिचीं पेयें नवीं घेतमी
घालाया कपडे नवीन ; ( किती नवनवे नाहीं ) मुळीं वाटे कशाची कमी
होती पूर्विं कसा ; अतो बदलली ती पार माझी स्थिती
लाटाच्यावर लागले मन डुलूं झाली मला विस्मृती ॥ ४ ॥

तों आला हळुं कुणि एक मागुनी कुणी कौपीनधारी मुनी

खेदाने हंसुनि म्हणे न असशी वेड्या इथें तू धनी
दारीं या करिती पहा टहळणी सारे पहारेकरी
जातां ये न तुला इथून करिं तू त्यांची अता चाकरी ॥ ५ ॥

जेह्वां हें कळले मला मुळिं नसे माझी इथें मालकी
सोन्याच्या पिंजऱ्या मधें अडकलों अत्यन्त मी पातकी
तेव्हां लक्ख प्रकाश तेथ पडला झाली नवी जागृती
रात्रीं घोर निजून जी मिळतसे सूर्य प्रकाशांत ती ॥ ६ ॥

वाटे ही पडली वरून बिजली पाशांत पाशोधरी
सारी उज्ज्वलता दिसे वर , परी अंधार अभ्यंतरीं ॥ ७ ॥

वाटे भेसुर सर्व रम्य ; न रुचे अन्नांतली माधुरी
वायुच्या लयींत बेसूरपणा वाटे मला असुरा
चित्ता सर्पिणि कल्पना डिवचती , तै मी म्हणें ; ये रडें
'  माझे धामच मोडके खिळखिळें ते पूर्विचे झोंपडे
माझी धोंगडि द्या गडीहि मजद्या  ते ओंगळे भोंगळे
ज्यानी कीं ती स्वतंत्रता मिळविली ते बावळे मावळे ॥ ८ ॥

Page 43

आई बाप उपाशि बंधु भगिनी जेथें तिथें न्या मला
त्या त्या बंधनिं प्रेम मंदिरिं जिथें आनंद कोंदाटला
जाडें वा भरडें मिळो मज नको सोन्या चि ही शृंखला

पाया मी पडतों तुम्ही मुनिवरा न्या न्या इथून कसें ही मला ॥ ९ ॥

( गांधी की तुम्हि अन्य हो कुणिं असां;न्या, न्या मला आपला )

Page 44

# लीला आणि बाळू

देईल देव भगवान् पुरता दयाळू
आईस एक इवळें बघ बाळ बाळू
घेऊं तिला अपण खेळवु खूप खेळू
येईल गम्मत नव्हें बर काय बाळू ? ॥ १ ॥

मागें जिला उचलुनी परमेश्वराने
नेलें कुठें तरि कशास न काय जाणें
जिच्याच   आठवणि  आठवितां मनात
आई रडे बसुनि नेहमि कोपऱ्यांत
तीं खेळणीं घरकुलें बघ बाहुल्याही
तीं पोलकीं पडलि पेटिंत आंत पाही
झालास तूं किति जिचा भटजी पुजारी
येइलतीच सुमती शिशुरूप धारी ॥ ३ ॥

धाडील देव तिजला बर खेळण्याला
खांद्या कडेवर खरोखर नाचण्याला
भांडू नये कधिंही आपण रे तिच्याशी

नाहीं तरी परत जाइल त्याजा पाशीं ॥ ४ ॥

ताई, परन्तु मज भाऊ हवा एक लहान
आहेस तूं बहिण लौकर त्यास भाऊ आण
'अभद्र मेल्या, अभद्र असलें नच बोल  द्वाडा
देवा, अतां म्हण असे सुमतीस धाडा॥ ५ ॥


आई खरोखर तुलाच भरेल रागें
वाटे तिला सुमति यावि फिरून मागे
जोडून हात दर रोज सकाळिं थावी
देवा, म्हणूं सुमति लौकर येथ द्यावी ॥ ६ ॥

—------


# ऐकावें श्रवणें जगतिं.....

ऐकावें श्रवणें जगतिं सकल तें सूज्ञास जें ऐकवे
प्यावें जें पिववे परन्तु पचवे खावें जसें खाववें
बोलावे तुम्हिं जे रुचेल सुजना; यावेच जें देववें
ठेवावें जवळीं सदैव घरांत अपल्या ज्ञात्यास जें ठेववें
मर्यादाङ्कित मार्ग आंखुनि असा हा ठेविला सज्जनें
जावें त्याच पथें निरंतर खरें खऱ्या जाऊ नये उन्मनें
बंधाऱ्यात उसळें हर्षें तरंङ्गवली

ज्याला बांध नसे झरा खळखळे तो शुष्क होतो तळीं
  मोठ्याची पुसतां बरोबरि  कधी सांगू करावी कुणी
मोठा घास लहान तोंडि कधिं ही ठेवू नये कोंबुनी
त्यांची शक्ति अपूर्व दोष पचती मालिन्य जाई लया
तेथें न उरे सारी घाण जगातली जलधिच्या पोटामधें वावरे

—---

Page 47 Blank

page 48

# स्वप्न

२५.०४.१९३४

स्वैर विहारि वाऱ्या वावडि पक्ष्या परि मी उडलो
नावें परि मी पवनो दधि मधिं सहज तरङ्ग डुललो
गुडगुडणाऱ्या गगनोदरिं जणुं गडगडले पथिं मेघ
हृदयपटावर हंसली खुलली बिजली ची रेघ
विमानिं उडुनी मी भग नन्दन - वनिंच्या कुंजीं गेलो
कुसुम परागा च्या शय्येवर पर्यंकीं निजलो
छुम् छुम् किंकिणि कर्ण मधुर ध्वनि माझ्या कानीं आले
सहस्रनयना मम तनु झाली मम तन व्याकुळ झाले
रंभा उर्वशि नाचत थय थय दिसले इकडे वळत्या
झेले झेलति खिदळति हंसती नव वेलि परि फुलल्या
सुगन्ध माझ्या हृदयान्तरिं हळु हळु दरवळला भरला
मागुनि माझ्या हृदय - मंचकीं कोमल चरणीं चढल्या
कुज बुज कुज बुज सुरु मग झाली बोलती मञ्जुळ वाणी
काळा काळाका भिन्न  कोणी  अवनि वरचा प्राणी

मन्दनवनिंच्या उंच मंचकीं डौलाने हा निजला

कोणी बोले द्यावें ढकलुनि खालि भूवरिं याला

थाम्बा थाम्ब म्हणती कोणी उडवुनि भृकुटी दोन्ही

करुया त्याला आत्मा होता कीं नव्ह तां कधि कोणी

Page 49

हळु हळु तुरु तुरु तुरु तुरु नाचत अगदीं जवळीं आल्या

माझें मनही नाचुं लागले हर्षित वृत्ती झाल्या

वेतरुलतिका परि तनु त्यांच्या लवचिक नर्तनिं लवलव लवती

माझे मन ही उडूं लागले जाई वर वर वरती

धरिला मग हळु हात एकिंचा ओदुनि हृदया जवळी

नको नको ती निवारूं लागे मी कडकडुनी कवळी

अधरांचे मधुमीलन होता कचकुन घे ईं चावा घेई बोटा कचकुन  अधरा चावा

(चुंबन घेता घेई कचकुन ओठा चावा)

तिरमिरि आली विवळत उठला साधी वैरिणी दावा

नयनांच्या मी उघड्या खिडक्या मधुनी भंवति पाही

स्वर्गिय चित्रपटाचें उरलें मुळिही नांव  न काहीं

खाट मोडकी मच्छरदाणीं फाटकि दिसली

फार

बोटा ओंठा चावुनि कचकुनि मांजर होय पसार

(बोटा चावुनि कचकुन, मउ मउ मांजर होय पसार)

—--------

Page 50

०२.०५.१९३४

# घारग्यांचे वाण

(काहीं तरी तळतसे कढईंत माय आई
 मला अवडतं खरं फार गोड,
तूं सांग काय तल शी असं गोल गोड
(बोबडं: आई मला अवलतं खलं फाल गोल,
तूं छांग काय तळछी अछं गोलगोल)
 सानंद बाळ पुसते' कलतेस काय?')

डोळे जसे गरगरीत तसे अपूप
पाही; म्हणे मजसि देछिल काय खूप ॥ १ ॥
खाईल देव मग देईन ब्राम्हणाला ।
देईन मी भग तुला बरं काय बाळा ॥
माझी असे चिमणि छोनुकली शहाणी
बोले तिला  चकविण्या अति गोड वाणी ॥ २ ॥
भावाचिया उडुनि येउनि अंकीं लोळे
साळुंकि उंच उंच उचचके वच मंजु ( गोड ) बोले
ती घारग्या हुनि असे अति गोड वाणी
झालीं सुरु मधुन लांबच लांब गाणी
' दादा, मिलेल बलं का खलं आज खाऊ
देईन त्यांतुन तुला मग खेळुं खाऊ ॥ ३ ॥

' देवास देउन पुढें मग ब्राह्मणाला
देईल माय मजला' मग तो म्हणाला
आतांच जा खरं तिच्या जवळून घे, घे,
भाऊ बहीण अग आपण खाऊ दोघे ॥ ४ ॥

वेला खला तूं अगदीच वेला
( वेडा खरा तू अगदीच वेडा )
देवास द्यावे मग ब्राह्मणाला
Page 51
देईल आई मग आपणाला
"छांगु तुला ले किति छाहण्याला" ॥ ५ ॥

देवा पुढें ठेवित ताट आई
त्यांतुन ना देव न घेई खाई
आला पुढें ब्राह्मण पूजनाला
बालेस आनंद मनांत झाला ॥ ६ ॥

घारी परी ती घिरटयाच घाली।
केन्द्रानन्तरीं दृष्टि हि झेंप घाली ॥
घेऊन ताटा भटजी निघाले
पाणी मुखाचे मुलिच्च्यां पळालें ॥ ७ ॥

लावी दृष्टी भटजीकडे ती
हातीं तुरी ठेवुनि तो हि जाती
कीं कावरी बावरि होय मुद्रा
चित्रांत आलें भरतें समुद्रा ॥ ८ ॥

—-----
Page 52

## अभंग

(१)

डोळे असुनी ही पाहतां  न येई । डोकें असुनीही नसल्या परी

मनानें विवेक सोडला रे सर्व । भरे तेथे गर्व दंभ ताठा

भौतिक विचार संचार करीती । भूतें हिंडतातीं चित्तीं जणूं

काय हवें तें ही मनाला न कळे । मोकाट सुटले वाऱ्या परी

धर्माच्या ठिकाणीं श्रद्धा नाहीं देवा ।

तुझ्या ठायीं भावा ठाव नाहीं

आतां तूझा ये दाखवी प्रभाव । जागवीं तूं भाव झोंपलेली

(२)

तूझी सत्ता खोटी म्हणण्याची पाळी । आतां येथें आली नारायणां जगतांत

पाहतां कीं नीट सारे सान थोर । उद्दण्ड आचार - मग्न झाले

तुझे अधिकारी सारे सांगकामें । करिती न कामें अन्य कांहीं

कोण मग आणी ताळ्यावर देवा यांना । बहकल्या जीवा सैरावैरा

रवि येई जाई खाली वर पाही । अर्धा मुर्धा राही पुरता शशी

आपुली मर्यादा सागर न सोडी । त्याला त्यात गोडी वाटे खरी

( ३ )

झाला जर ऐसा  पुरा धुमाकूळ ।कुठें नाहीं ताळ तंत्र मुळीं

चालवितां येना स्वतांजरी राज्य | करावेंच त्याज्य भूपतीने

काय जणं कुठें लपून बसला । कुणिं न पाहिला कधीं केव्हां

Page 53

स्वामी तूं कसा जगताचा असा । नाहीं दिसतसा कधीं  कोठे

दवऱ्याला ही ना कधीं निघे स्वारी । मगदिशा चारी धुमाकूळ

—---

Page 54

# जुलूम ( गरीब शेतकरी )

(१)

हृदतांत दिली ता ५ -६.१२.१९३५

पिळुनी रसाळ ऊसांतुनि कादि तूं रसाला ।
कांड्यामध्यें नृपाळा रस धुंडिशी कशाला ॥
कमळांत सांचलेल्या कोषांतल्या धनाला ।
लुटतात भृंगमाला त्यजतात नीरसाला ॥
मधुहीन कोरड्या कां  पिळतोस पोंवळ्याला ।
मउ मेण आंत उरले सारा मधू उडाला
जल शोषिले करां नीं झालें तळें रिकामें ।
हा भास जीवनाचा नुसतां उरे तळाला ॥
इथल्या जळें कसा तो जलधी तुझा भरावा ।
जेव्हां न आचमनही येथें मिळे कुणाला ॥
येईल हातिं माती जुलमी मुठींत तुझ्या ।
हट्टास पेटुनी तूं जरि घेशि जीवनाला ॥
सारा तुला हवा ना सारें तुला दिलें की ।
प्राण विना न आतां उरलेंच द्यावयाला ॥

Page 55

## दैवगति

(२)

भ्रमते जग उफरोट । कांते ॥

उलटल विधि - गति मज दिसुं लागे उलटे सगळे सुलटे

उलट्या मार्गें अवनि फिर ते गगनेंहि उलट्या वाटे

नयनिं तारका उलटति दिसले बिंब पडे जळिं उलटे

जुळलेलें से जेथें दिसले तेथें फुटले फाटे

वाटे सरिता स्ववती ( झरती ) जेथें तिथले जळ ही आटे

जाई जुझच्या वाटे मधुनी जातां लागति कांटे

माझे मजवरि उलटति; घरचे वासे फिरती उलटे

मोहुनि हास्या च्या मी भासा मृग जलिं फंसलो वाटे

अंतरिं बंधन फुटले फारे उर , कंठहि दाटे —-------

Page 56

(३)

## विवंचना

नाहीं घरांत बाळा , तुज काहि खावयाला

मनिं कालवे; न प्याया तुज कांहि द्यावयाला

नाहीं घरांत माझ्या अथवा स्तनांत थेंब

उरली असे पयाची डोळयांत धार बाळा

तव दीनवाणि दृष्टी शिरते उरीं सुरीशी

चिरचिर चिरें जलाची मृदुधार काळिजाला

माझ्यांघरीं बसाया किति येथ येति बाया

मधुमक्षिके परि त्या साऱ्या अतां पळाल्या
त्या मारि ती उडुनी मज डंक जागजागीं
त्यांचें न तोंड धरवे टपलेंच चावण्याला
मागूं कुणास बाई तरि कोण देई सांगा
माझे मुळी धडोना मन तोंड याचनेला
झाला असें मला हा चहुं बाजु कोंडमारा
दुर्दैव वेढिते या सोन्या चिया परी घराला

—----

Page 57
Poem on forthcoming page initiated and struck off

Page 58
(४)

# निज निज बाळा रे !

तूं आला। हतभागिनीच्या कुशिला। कुठल्याघरिं बाळ !
पोटाला। झांकाया नच तनुला। तुझि किति आबाळ। ॥ १ ॥
(फटफटलें। नुकतें; पण नभ भरलें। दिनिं रजनी झाली।
टपलेले। आफाडुन बसलेले। किति यम भवताली ॥ २ ॥ )
जगताच्या। अभिनव क्रूरत्वाच्या। झळि तुज नच लागो
तरि त्याला। विसरींक्षणभर बाळा। डोळा तव लागो ॥ ३ ॥
तूं देवी। निद्रे ! उचलुनि घेई। मग छोनुकल्याला।
या ज्वाला। हृदयीं धग धगलेल्या। शिवुं दे  न च त्याला ॥ ४ ॥
भूकेला। रुचकर तव मधुपेला। दे तूं मग त्याला।
तव अंकीं। उन्नत मृदु पर्यंकीं। लागूं दे डोळा ॥ ५ ॥

संसृतिच्या - । खर तर मध्यान्हाच्या - तापें तपलेल्या -

वत्सला । लावि उरा मृगशिशुला (हरिणाला ) । मनिं तळमळलेल्या ॥ ६ ॥

पदराची । रसरसत्या प्रेमाची । त्यावरि करिं छाया

अंगाई - गीतें निः रचन गाईं त्याला निजवाया

—------

Page 59

blank

Page 60

२७.१०.१९३४

प्रसिद्ध झाली केसरींत१६.११.१९३४

( १९ )

## महात्म्यांस

तुझी राजनिष्ठा कळेना नृपाला ।

प्रजाभक्ति तुझी कळेना जनांला ॥

तुझी आत्मनिष्ण अगम्या अपारा ।

तुझी सत्वनिष्ठा किती तत्त्वसारा ॥ १ ॥

जगाच्या वरी उच्च आकाशगंगा -

तटीं तूं विहारा करीशी विहंगा

तुझ्या अंतरिक्षातल्या ज्या भराऱ्या

कळेना कुणाला कशा त्या बघाव्या ॥ २ ॥

अतां तूं सदा सोड ती राजनीती
जिची प्रीति वारांगनेच्या परी ती
टिके वेळ थोडा तिची भाव रीती
कटाक्षान्तरीं व्यंग्य छद्मप्रतीती ॥ ३ ॥

जिथे मोहिनी राजनीती न बाधे
जिथें दुष्ट कावा न कीं डाव साधे
जिथे वास नाहीं कुनीति प्रसंगा
तिथें वाहुं दे वाङ्मयी भावगंगा ॥ ४ ॥

शिवे ना कुणी ज्यांस तुझ्या शिवाय

Page 61

कुणी हांक ज्याची न ऐके च हाय
सहा दीन प्राण्या परी मूकवाणी
तिथें ऐक त्या दुःखितांची कहाणी ॥ ५ ॥
भुकेले जिथे राबती अर्ध पोटीं
तुझे लाडके यातना ज्यांत मोठी
तुला पाहतां ज्यास ये तो उमाळा
करीं जर दया त्यां वरी रे दयाळा ॥ ६ ॥

असे क्षेत्र तुझे निराळें जगांत
तिथें पेर बीं तूं मनोभूमिकेत

रुजुं आत्मसृष्टी मधे खोल द्यावें

पिकाच्या विलासा तिथें तूं पहावे ॥ ७ ॥

—-----

Page 62

# ताम्बे वाढदिवस

२७.११.१९३४

रत्नांचे तव उंच तें विलसतें स्वर्गीय सिंहासन

मी या भूवरि  हा अकिंचन असा केवो करूं अर्पण

श्रध्देनें म्हणुनी आतां ततपदीं पुष्पांजली अर्पुनी

ओंवाळीत असे तुझ्या वरूनि ही हा राम नीरांजनी

येथें उत्कट भावना सुरचना अत्यन्त वाङ्गाधुरी

वाटे रम्य  त्रिवेणि संगम असे संपूर्ण काव्यान्तरीं

दे ये रे रस प्यावयास रसिका ही वाहते जान्हवी

येथें भास्कर बिंब आंत विलसे चित्रांस आनंदवी

—-------

# कांचनमाला

अर्पिन माझी कांचन माला।  हृदयांतिल भास्कर बिंबाला ॥ ध्रु० ॥

नवचैतन्यें अवनी हांसे

माझें उपवन भरलें वासें

कळ्या कळ्यांतुनि कला विलासे

सुवर्ण कमलीं सौरभ भरला ॥ १ ॥

विविध विखुरले मणि गण गगनीं

हारावलच्या अंत रिं करुनी

चंद्र पदक ही आंत गुंफुनी

Page 63

रात्रीं जागुनि गुंफलिमाळा ॥ २ ॥

पदविहीनपण चंचल अरुण

उच्छृंखल हा उन्माद तरुण

क्षण दावी अनुराग विलक्षण

ही अर्पिन नच नवयुवकाला ॥ ३ ॥

पसरी आपला दिव्य पसारा

थय नाचवि जो संसारा

करि जो मानसिं हंस विहारा

ही  अर्पिन त्या हृदयेशाला ॥ ४ ॥

तळ पुनि तेजें तेजोमाली

उचली वर  हिज संध्याकाळीं

एकरूप मग माझी झाली

त्याच्या किरणाची ही माला ॥ ५ ॥

प्रतिभा द्युति युति भास्कर किरणें

तांबे झाले सुंदर सोनें

याला म्हणती जगती जगणें

लखलखाट चहुं बाजुस झाला ॥ ६ ॥

—----

Page 64

०५.०७.१९३५

# क्षिप्रेवरला जोगी आला

क्षिप्रेवरला जोगी आला । साधु संघही सवें निघाला ॥ध्रु०॥

निर्मलतेची ( सद्भावाची ) कफनी घाली ।
करीं कमंडलु सादी शेली ।
सद्‌भावाची कफनी घेई वाटी झोळी
अलख जागवि ( दारो दारीं ) फेऱ्या घाली
' भवति प्रतिभे ! भिक्षा घाला' ॥ १ ॥

नभोज्योति नकत्र परि मेघा मागुन । ऐकुनि कानी मंजुलवाणी
खिडक्या मधुनी पडद्या आडुन ज्योति सुरल्या मेघामागुनी
देवी ( तरुणी ) बघुनी , स्वर्गीय गुंजन - म्हणती स्वर्गिय गुंजन करूनी
करिती; ' जोगी कोणी कुठला आला' ॥ २ ॥

करूनी अभिनव पद विन्या सा विसर्ग रुचिरा मधुमय हासा
प्रगटुनी मधुगति विलासा अर्पिति वाङ्मय मधुरस त्याला ॥ ३ ॥

रावा पासुन रंकापासुन खेड्या पाड्यांतुन शहरांतुन

कुठुनी कुठुनी कण कण वेचुनि ओंजळ भरली अर्पायाला ॥ ४ ॥

Page 65

रसिक मंदिरा वरले कळस

दुरुन दिसतां हंसलें मानस

जोगी करूनी मोठे धाडस

आला ओंजळ आपलीं अपयाला ॥ ५ ॥

कर सुम दल पुटिं मृदुकर ( सुम ) संपुटिं सांचविलेला ।

फिरुनी भिक्षामागुनी फिरुनी गोळा केला

रसिका मधुपा ! घे मधु पेला

( सद्भावाने अर्पियलेला )

( अर्पी जोगी ज्याचें त्याला ) ॥ ६ ॥

ऐकुनि कानीं सुमधुर वाणी ।

देवी ज्योतिस्फुरती पडदा आडुनि मेघा मागुनी

मधुपद हास्यें सन्निध येउनी

अर्पिति वाङ्मय मधुरसत्याला

तो मधु या सुम दल पुटिं भरला ।

फिरुनी फिरूनी गोळा केला

रसिका मधुपा तुज अर्पियेला

हृदय संपुटी सांठव याला

Page 66

क्षिप्रेवरला जोगी आला । साधुसंघही सवें निघाला ॥ ध्रु० ॥

निर्मलतेची कफनी घाली ।
सद्भावांची घेई झोळी ॥
अल्लख जागवि , फेऱ्या घाली ॥
' भवति प्रतिभे भिक्षा घाला ' ॥ १ ॥

ऐकुनि रानीं सुमधुर मंजुळ वाणी ।
न भो ज्योति परि मेघामागुनी
ज्योतिस्फुरल्या मेघा मागुनी
म्हणती स्वर्गिय गुंजन करूनी
' जोगी कोणी खालीं आला'
करूनी (अभिनव ) मधुपद पदविन्यासा ।
निसर्ग रुचिरा मधुमय हासा ॥
प्रगटवुनी मधु भाव विलासा ।
अथिति वाङ्मय मधुरस त्याला
तो मधु या सुम दल पुटिं भरला ।
फिरुनी फिरुनी गोळा केला ॥
' रसिका मधुरा ! तुज अर्पियला ।
हृदय संपुटीं साठव त्याला '

रा. वा . पं
( रामचन्द्र वामन पन्तोजी )
१७.७.१९३५

—--------
Page 67

## भारतदेवी

इतिहासपूर्व कालीं किंवा जगत्प्रभातीं ।
प्राची ललाम भूता ही भारतास्वय भूमी ॥

जीच्या शिरीं हिमाद्री मुकुट स्वरूप शोभे ।
रचिला विशाल वृक्षीं वेणी कलाप जीया ( बंध )

गङ्गा तशीच सिंधू नवमौक्तेकें तुषारें ।
उचलून कर तरङ्गें वदनास भूषवीती ॥

भ्रूपक्ष्म पंक्ति वाटे काश्मीर केशराची ।
तत्पद्म फुल्ल नयनें तियले गुलाब गाल ।
विलस तरङ्गिताङ्गी कल्लोल लोल माला ॥

शोभे सरिद्गणाची पंजाब कण्ठ देशीं ।
प्रत्यन्त पर्वतांची पंक्ति प्रलंब ॥

विंध्यादि बालरूपें क्रीडे उर: स्थलीं तो ।
तापी तथैव रेवा रजतांचला नद्यात्या ॥

सप्ताद्रि मेखलेचे जणुं काय रम्य कांठ ।
त्या सागरांबरेचे प्रक्षालि आंध्रिपद्म ॥

कन्याकुमारि देवी जलधा ज लें स् स्वतां ती।

Page 68

ही दिव्य भूमि ऐशी धन धान्य ऋृद्ध गर्भा।
सृष्टि विलास हांसे विविधें नितान्तरम्या॥

शोभे कला कलांच्या रमणीयकांति नेही।
रजनीचिया तमांत होती सुशोभता त्या वेळि॥

त्यावेळीं ती प्रतीची होती तमो निगूढा।
नेम क्रमें परन्तु मग हिंद भूमि अपली॥

झाली हळू हळू ही तिमिरावृत्ता परन्तु।
आतां परी पुन्हां ही नव जागृति प्रभेने॥

प्राच्यालयीं विलासे बालार्क शासनानें |
त्या भार तयि माते सगळे करू प्रणाम॥

श्रध्दोपहार अर्पू नव वाङ्गमये पुजूं।
प्राचीन संस्कृतीचा अवतार हो नवा हा॥

नाना कलोयमांनीं नव वरि बालकानीं।
मदतीस मिळो जें देवांस हि जे मिळेना॥

Page 68 (अ)

## स्वागतपर पद्य

( चाल : भक्त जन सदा )

धन्य समय हा , आले सद्वृन्द अहा ॥ ध्रु० ॥

बोलवित ज्यांस माय ।
डावणपुरी हांक जाय ॥
थेती त्वरित अंतरिं द्रवित
हर्ष त्यां महा ॥ १॥

रोगावल शरीरें ।
अर्वति, करून शिशुगण नमन ।
मातृपदिं पहा ॥ २ ॥

जननि वदनिं विलसे स्मित ।
अमृत करा ती पसरित ;
विकसितनयन झरझर स्रवुन ।
करिति स्वागता ॥ ३ ॥

Page 68 (ब)

## अल्पवयी विधवेचे स्वप्न

प्रवास कराया दुरी । गेला शशी दिगन्तरीं । काळोखदाटे अभ्यन्तरीं रजनीच्या ॥ १ ॥

तिच्या परी एक कामिनी । शोकें उदासीन मनीं चिरगुटांच्या शयनीं । पहुडली ॥ २ ॥
लावी बाळा प्रेमें उरा । संतप्त हृदया शीतवारा । आशांचा एक आसरा । बाळतियें ॥ ३ ॥
कीं झाकी दीपज्योती । आपल्या पदरा खालती । रक्षाया झंझावातीं । जगतेचया ॥ ४ ॥
ती षोडष वर्षीया बाला । आठवी सुखाच्या काळा । तसाच लागे तिया डोळा । विचारांत ॥ ५ ॥
झांकता नेत्र - कपाट । विचारांचे काहूर दाट । दिसली तिज नवी वाट । दिव्यत्वाची ॥ ६ ॥
नेई तिज विचार शृंखला । कुठल्याशा स्वर्गस्थळा । तेथे रिसे विकसला । पूर्णचंद्र ॥ ७ ॥
सिंहासनीं दिव्य मंदिरीं । नाथ दिसला अंतरी । पाहतातिला करें धरीं । प्रेमें बोले ॥ ८ ॥
" कां हें भूतलीं शयन । का कोमेजले वदन । कां सुजले हे नयन । कां राग हा? " ॥ ९ ॥
फुलाविना तव केश । वेली जशी नामशेष । विकासाचा नु रे लेश । कां असें हें? ॥ १० ॥
उध्वस्त झाले उपवन l गेलो प्रवासा कुठुन् ' पश्चातापें दग्ध मन झाले त्याचे ॥ ११ ॥
कां कुंकुम - हीन भाल । माझी ठेव माझें बाळ । त्याला नीट तूं सांभाळ । झालें तें झालें ॥ १२ ॥
आता न जाईन कधीं । तुला नेल्या विना अधीं । भेटीला फार अवधी । झाला आपल्या" ॥ १३ ॥
ही अनुनयाची वाणी । सुधा धार ओती कानीं । शुष्क वेली दीन । बहरली ॥ १४ ॥
अवसेच्या अंधकारीं । अंतरलीं तारका परी । स्फुरती तीच्या अंतरीं । भावनावली ॥ १५ ॥
किंवा बिंब तारकांचे । मरीच्या हृदयीं नाचे । तेवीं नृत्य भावनांचे । झालें सुरु ॥१६॥
रोमांचिता झाली काया । अंतर्लोचनें ती पहाया । लागे मानसीं स्मराया । पूर्वसुखें ॥ १७ ॥

Page 69

तोंच झाले बाळ जागे । चळवळ उगि होउं लागे । सुखाचे तुटले धागे । स्वर्गातल्यां ॥ १८ ॥
तुटल्या मोत्यांच्या सरी । विखुरल्या पृथ्वीवरी । त्याला गोळा कोण करी । अबलाती ! ॥ १९
॥ कीं चमकणाऱ्या गगनीं । तारा पडल्या तुटोनी । लोहमय शमलीं अग्नी ' गेलीं भरूनी ॥ २० ॥
वस्तुस्थिती ची ये लाट । रुकली स्वर्गाची वाट । अंधकार पसरे दाट । झाली जागी ॥ २१ ॥
आला पोटांत उमाळा । " माझ्या हृदयाचा विह्वाळा । काय केले रे बाळा ! । या समयीं ॥ २२ ॥
गेला क्षण उत्सवाचा आतां पुन्हां तो कशाचा । प्रवाह नेत्री आसवांचा । झाला सुरु ॥ २३ ॥

त्यांत बुडाले सुख स्वप्न । झालें मानस उद्दिन । प्रेमें घे बाळाचें चुंबन । परापरा ॥ २४ ॥

—------

Page 70

## कां ग मिछा आला

(बोबड़े बोल)

कां ग मिछा आल्या
ताई, नुहत्या दादाला ॥ ध्रु० ॥
मिलती बाजालात कुथे त्या
आनिन बलंका दों पैछाच्या
थोला आनुनि गोंदहि आता
लाविन तुजला - कां मिछा … .
काकी तुज मी आनुन देइन
तुला मिली बलं का लाविन
बोवाजी न मग तल होइन
भिव विन वाला - कां ग मिछा …
मिछान दिछती अपल्या काका
का ग मोथे नाहीं ते का ?
अछ कछ हें झालं छांग
लावेन त्याला _ कां ग मिछा … .

—----

Page 71

## आज तरी घरिं लवकर याया

आज तरीं घरिं लवकर याया होइल कांहों वेळ ? ॥ ध्रु० ॥

आल्यावांचुन घांस न घेइन

अन्न झांकुनी मी न च ठेविन

जेवुं बरोबर दोघे आपण

जोडा घालिन  दारिं पालथा हांका  हि मारिल वैल ॥ ध्रु ०॥

क्लबास जाणें रहित कराना

माझी विनवण कधिं तरि माना

खेळ पाहण्या आज चला ना !

किंवा कॅरम मांडुन म्हटलं खेळू अंमळ खेळ - आज ०

एक म्हणावं एक करावं

खरं काय तें कधिं न कळावं

अशा माणसा किति हि म्हणावं

येरे माझ्या पुन्हां मागल्या चाले वेळो वेळ - आज ०

शर्थ जाहली सांगायली

शर्थ जाहली वागायची

आणा शपथा वाहायची

तोंडाला म कुलुप घातलें शप्पथ शब्द निघेल !!! - आज ०

Page 72

मुक्या भावना स्तम्भित झाल्या

हळुहळु हृदयीं वितळु (  द्रवूं ) लागल्या

अश्रु पूर मग खळ खळ खळ खळला

ओलांड्या ताब कुणाची नाव जगी दुर्मिळ - आज ०

(२७)

(गझल)

# आधुनिक महाराष्ट्रा बद्दल एक अपेक्षा/कल्पना

महाराष्ट्राचि वृत्ती ही जगाला तुच्छ लेखावें
स्वतांच्या कीं पुढें कोणा कधीं केव्हांन मानावें
अशीही बाल प्रौढीं कीं म्हणा हा आत्मविश्वास
बढाई मारणें नुस्तें आतां महाराष्ट्रात पाहावें
नद्यां जैशा महाराष्ट्रीं करीती व्यर्थ कल्लोळ
रिकाम्या शीघ्र होतीं त्या  तळीं पाषाण पाहवि
शिवाजी लोकमान्यादी जहाळें मानलें पूर्वीं
परी आतां उरे  माला जपावी घेउनी नांवें
तुझे हे नांव मोठें की महाराष्ट्रा, ' महाराष्ट्र '
नसे तूं ' राष्ट्र' हो कैसें  ' महा' मी पूर्वि लिहावें
न कोठे कांणत्या क्षेत्रीं महाराष्ट्रीय नेतृत्व
कुणांच्या स्वाभिमानाला गमे हे शब्द झोंबावे
नकोही भांडखोरीची विषारी वृत्ति स्वार्थाची
झटूं कायां तुझी द्यावी परार्था स्वार्थ मानावें
उठावी  लाट मोठी ती बुडावी त्यांत ती फूट
जुळूनी संघशक्तिच्या जुटीनें कार्य ते व्हावे
जगाच्या सर्व शक्ती त्या वहाव्या या महाराष्ट्रीं

समुद्री एकरूपत्वा  नद्यांनी जेवि पावावें
स्मरावें पूर्वि जे केले कसे त्वां मावळे
अताहीं कां नं  पूर्वीची तु वा  झेंडे न कां न्यावें
—----

Page 74

# म्हातारी आई

(सुनीत)
म्हातारी  जमती गळून पडले सारी जरी दांत ते
हाले मान दिसे कमी तरि वरी प्रेमामृता वर्षते
डोकें ही पिकलें हिमाचल शिरीं वाटे लुली पांगळी
माझी तूं पणं माउली मजवरी विस्तारिशी सावली
तुझें दूध पिऊन पुष्ट तनु मी उन्मत्तसा पोसली
तूंझें बाळ लहान मी खिदळलो आंगावरी खेळलो
झाली तूं जननी किती हि दुबळी माझीच तूं माझिनां
" रोमांचा उठवी, तुझा कर फिरे तूं मूर्त सद्भावना
' गोरी कोण? घरांत ही सवत कां? सावत्र आई हुजी
सोन्याचें घर हें हिचाच पगडा बाळा, फजीती तुझी
माझाकाल नसे  तुझेंच  बघ तूं, सांभाळ  तूं आपलें ।
थोडें मी म्हटले परी उमज तूं होवो तुझें चांगलें ॥
या गंगा यमुना तुझ्या नयनिं कां ! कां पूर आला महा
होते गss तुझ काय सांग जननी ! माझ्याकडे तूं पहा !!! ॥
—----
Page 75

# माझा मी मुख्त्यार

माझा नी मुख्त्यार

जातो येतो जिथें रुचे मज माझा मी मुख्त्यार ॥ ध्रु o ॥

अडत्या येता सरिता बांधुन

लहरी नागिणी मुलि(न/)तजु मानुन ( चरचर कापुन )

डोलत नांवे वर आनंदुन

हाता हातावर जलदेवी नेती वारिधि पार - माझा मी … ॥

उडत चाललो मेघावरती

विजा कधीं त्या हसू लागती

आणुनि त्यांना अवनी वरती

तांब्याची पदि बेडी अडकविं चंचल चपला फार  - माझा o

अग्नि येउनी रथा चालवी

चित्रे काढुनि अर्पितसे रवि

वायु मनाला गीतें रिझवी

बागा फुलवी झाला माळी वरुणहि ताबेदार - माझा ०

झाल्या दासी देवि देवता

फुलुनि अशी मी प्रौढि मिरवितां

धन्य वाटलो मज मानवता

अवनि जननि मनि धक्का बसला झाली ती बेजार - माझा ०

Page 76

तिला कळे कीं रवि कर धरूनी

मला चालवा गगनां मधुनी

फुगडी खेळी गरगर फिरवुनि

प्राणनाथ तेजोनिधि जगिं चालवि मम संसार - माझा ०

तिला कळे कीं जपून लाजुन

फिरणें निश्चिति कक्षे आंतुन

तिनें बघितलें किति परिवर्तन

चमचमणाऱ्या कळसासह तो मेरू झाला ठार - माझा ०

तिला कळे कीं वायु सांवरी

वरुणदि तीचा ताप निवारी

स्थल जल देवी तिज शृंगारी

वाटे तिजला देवी देवता रक्षक प्राणाधार - माझा ०

बघून मानवतेचा डौला

चुणूक थोड़ी दावायाला

गगनीं भिडल्या अन्तर्ज्वाला

विहार भूमी ( क्वेटा ) वर अवतरला नश्वरतासंभार - माझा ०

(मग झाला रुद्राचा अवतार)

—------

Page 77

# कां न तुम्ही या आंत

कां न तुम्ही या आंत

असे कां कसे उभे दारांत ॥ ध्रु० ॥

कशास शंका या या सदनीं

तुम्हा विना ही निर्जन अवनी

अमृत किरण द्या निघु निज नयनी

बुडुं द्या  मजला त्यांत - कां न०

वाट कशाची तुम्हिं हो बघतां
थकुनि जाय मी वाट पहातां
अशी जरी ही उदासीनता
काय माझी हो वाट !!! - कां न ०

झुळुकी तुमच्या नि:श्वासाच्या
आशा माझ्या मुक्या जिवाच्या
फुलविति कळिका उद्यानाच्या
विकसो नवी प्रभात - कां न ०

नुसते हसणें तळमळनी मन
निघुं द्या कांहीं अधर - पुटांतुन
ज्यानें माझें राहिल जीवन
निर्मल गीतें गात

Page 78

भाषा माझी नीरस नीर
नाहीं कांहीं उपहारास्तव
जातां कां हो म्हणुनी यास्तव
जोडितसे मी हात

—-------

Page 79

## मेरुच्या शिखरीं चढेन ....

मेरुच्या शिखरीं चढेन अथवा चालेन पाण्यावरी
पंखांवांचुनही उडेन ढगही पिंजेन पैजेवरी
त्यांचें काढुनि सूत तें विणुनि मी रंगून अंगावरी -
वस्त्रा पांघरूनी सुरेंद्र धनुसा शोभेन पृथ्वीवरी
नांवे वाचुनि पार मी जलधिच्या जाईन अभ्यंतरीं
मोत्यें भक्षुनि मी जिवंत जगतीं राहीन हंसा परी
पक्ष्यांची मधुरा गिरा समजुनी त्यांच्या मधें राहिन
डोळ्यांनीं न दिसे कुणा सकल जे संपाति सें पाहिन
माझें पुष्प विमान मंगळ बुधा चंद्रादिकां वेधुनी
ब्रम्हांडांत फिरून दर्शन करी तें श्रेष्ठ ब्रम्हाहुनी
सृष्टी जोडुनि हात दावित मला सृष्टींतली दिव्यता
दिग्देवी मज दाविती दशदिशा कोणा नये पाहाता

*   *   *

जेव्हां स्फूर्त असेच दिव्य प्रतिभा देवी जगन्मंगला
तेव्हां उत्सव हा अपूर्व दिसतो प्रत्यक्ष सारा मला

—----

Page 80

## भविष्य -पुराण

शौनकादि सूतां प्रती ।
विनम्रभावें म्हणती । सांगा कलियुगाची स्थिती होणार जी ॥ १ ॥
श्रोते व्हावे सावधान । पुढील ऐका आख्यान । कलियुगाचे महिमान । सूताचे सूत्र - वाक्य ॥२॥
सूत म्हणे शौनकादिकां । प्रश्नकेला बरवानिका ।उपदेश सांसारिका । अमृतोपम ॥ ३ ॥

पुढें होणार जें कांहीं तें सर्व सांगण्यावेळ नाहीं । थोड्यांत उमजा सर्व काहीं । बीजरूपें ॥ ४ ॥

जैसा वाढे वटवृक्ष । प्रथम असून अलक्ष्य । विस्तारे अनंत सदृक्ष । हळू हळू होतसे ॥ ५ ॥

तैसा अर्थ ध्यानी आणा । क्षण करून अंतर्ध्याना । भविष्यकाळाची रचना । सूतं सांगे ॥ ६ ॥

कलियुगीं समाजास्थिती । लोकाची विपरीतमती । सर्वसंगतींत विसंगती । निर्माण होइल ॥ ७ ॥

शिथिल समाजबन्धने । तैशीच शिथिल कवने ।तसें वागणें चालणें । होईल पुढें ॥ ८ ॥

लोकांसी नको निर्बंध । जाति पाति इष्टसंबंध । प्राचीन संस्कृति गंध । नष्ट होतिल ॥ ९ ॥

तो प्रचंड झंझावात । प्राचीन संस्कृति क्षणांत । विलीन कालगर्भांत । निश्चयें करील ॥ १० ॥

मोडेल रूढिचें बंड । लोक होतील उद्दंड । शास्त्र मर्यादा राजदंड । निरुपयोगी ॥ ११ ॥

अभक्ष्यभक्ष्याचे प्रकार । स्वैर आहार विहार । घटस्फोटादि प्रकार । होतील सुरु अनेक ॥ १२ ॥

मिशांस मिळेल तिलांजली । पुरुषापरी स्त्रीकेशावली - l रचना होईल त्यावेळीं । उभय एक वेष । एकवेष ॥ १३ ॥

पौर्णिमेचा चंद्र गगनी । जैसा लहान होतो क्रमा नीं ।

Page 81

तैसे कुंकुम कलांनी । घटत जाइल ॥ १४ ॥

जाई कोर लहान विलया। तैसे भाल ठेवितील स्त्रिया। होतील सगळ्या अमावस्या प्रकाशहीन ॥१५॥

पुरुष होतील निमुच्छ । स्त्रिया राहतील निकच्छ । साबू लाऊन स्वच्छ । अंतरीं निराळे । न करून

प्रातर्विधी । बिस्किटे चहा कॉफी पीतील आधी । ती ब्रम्हकर्माती परमावधी । समजली जाइल ॥ १६ ॥

जाईल लया संध्या वंदन । त्या बरोबर मौंजीबंधन । शास्त्रीय विवाहाचें खंडन । चालेल स्वैरपणें॥ १७ ॥

जाउनि पूर्व रुढिचे प्रकार । होतील रुढ नवे आचार । स्वतंत्र विचार प्रचार । होइल निःशंक ॥ १८ ॥

विवाह म्हणजे हातांत हात । माळ घालावी गळयांत सर्व पूर्ति चहा पानांत । समजली जाइल ॥ १९ ॥

चहात बुडेल ब्रम्हांड । त्यांतच सारे कर्मकांड । जुन्या जागी नवे थोतांड । सुरु होइल ॥ २० ॥

बंडखोर (वाङ्ड ) वाङ्गमय निर्माण । मानलें जाइल प्रमाण । तेच आप ऋृषिवाक्य जाण । वानुनी मानतील ॥ २१ ॥

आत्मानात्म विचार । यमनियमाचे आचार परमार्थ सिद्धि चे प्रकार । हे पोर खेळ ॥ २२ ॥

तर्कट शास्त्री हे थोर । थोरां थोरां म्हणतील पोरं । वृत्तीयांची छचारे (?) । फैशनेबल ॥ २३ ॥

तर्कशास्त्रांच्या तर्कट रीतीं । प्रतिपादितील अपली नीती । उच्छृंखलता प्रचीती | येईल क्रमें त्यांस ॥ २४ ॥

युद्धें होतील प्रचंड । स्वार्थ प्रेरित उद्दंड । स्वैराचार मान अखंड । लोक व्याकुळ ॥ २५ ॥



रजनीच्या अंधकारीं । वावरतील अंधा परी । त्रस्त होतील अंतरीं । स्वार्थ लम्पट ॥ २६ ॥

सृष्टीचा चक्र नेमि क्रम । आणील ध्यानीं त्यांचा भ्रम । मग होईल नवा उपक्रम नव्या सृष्टिला ॥ २७ ॥

प्रथम मेघांचा गडगडाट । मग वीजांचा कडकडट । नि:स्वार्थ लयिची नवी लाट । होईल सुरु ॥ २८ ॥

सुटेल आपल्या पुरतें पाहणें । दुसऱ्या करितां हें जगणे । नसण्यांस वाटेल असणें । सत्ययुगारंभीं ॥ २९ ॥

पुढें या भविष्य - पुराणा । सांगेन तुम्हांस जाणां । माना आज समाधाना । इतुक्यांत ॥ इतिश्री अवंतिका पुराणान्तरगते पंतोजीत्युपनाम्ना कविवर्येण वामन सूनुना रामचन्द्रेण निर्मिते सुत शौनकादि संवादात्मके ' भविष्य - कथनं' नाम प्रथमोऽध्यायः ।

—---



# मंगळाष्टके

गोपाळा तुज बाल कामधेनु परिही ( मी / ) कीं अर्पिली न नोवरी

ठेवी कोमल प्रेम बंधनि हिला प्रेमें धरींतू करी

देई स्थान घरांत ते वि हृदयीं ही इंदु शी निर्मला

होवो उज्ज्वल कांतियुक्त घर ते कार्या करी मङ्गला

—---



# हा ग्रंथ सुन्दर असे मम जीवनाचा

येथे प्रवाह विलसे सगळया रसाचा

चित्रें इथें सुबक सुंदर भावनाचीं

गीतें इथें मधुर ती शिशु गायकांचीं ( १ )

रंगी बिरंगि मुखपृष्ठ चकाकणारे
ग्रंथांतरंग मधुतावर दावणारे
येवोत वाचक तदंतर पाहणारे
त्यांतील अर्थकळतां  मनिं हांसणारे ( २ )

जैसा नभोंगणिं वरी हंसारा पसारा
क्रीडांगणांत घरिं क्रीडति बाल तारा
मागून ये हंसत रांगत बालचंद्र
त्यांच्या मधें हंसतसे कवि रामचंद्र ( ३ )

होत्या जरी मज मुलीच मुली अजून
रंगून जाय मनिं मी तारि त्या बघून
बोलाविती घरकुलांतिल जेवण्याला
मी जेवतां मजसि ढेंकर काय आला ( ४ )

त्यांची जरी चिमुकली दिसण्यांत चूल
संसारही चिमुकला सगळें कबूल
Page 85
( मोठ्यास लाजविती खेळ हि बालिकांचे )
त्या भावनामय कलाकृति निर्मितात
संसार चित्र किति सुंदर ( दावितात / ) रंगतात ( ५ )

सासू सुनेस कधिं सासुरवास दावी
दावी नणंद ठसका अतिमानभावी
किंवा कसा अतिथि पाहुणचार व्हावा
तुम्ही मुली जवळुनील धडा शिकावा ( ६ )

कांही कळे न व्यवहार सुशिक्षितांना
त्यांना म्हणा घर कुल्यांतच कां शिकांना
मोठ्या सभांत तडजोड करावयाला
या या धडे घरकुल्यांच घ्यावयाला ( ७ )
शब्दावडम्बर न से वा कुतर्कवाणी।
कोटिक्रमांस न कुणी कधि स्वप्निं आणी
(कोटीक्रमांत (फसती /) भुलती जगतांत प्राणी)
येथें असे सरल निष्कपट प्रवृत्ति
त्या देवाता घरकुल्यां तिल बालमूर्ति ( ८ )

बाई कधीं बन ति मास्तरणीहि बाला
त्या घालती घरकुल्यांत अपूर्व शाळा
तेथें व्यवस्थित मुली वसती बघावें।
पंतोजिनें शिकविणें शिकण्यास जावें ( ९ )

Page 86 skipped
redirected to
Page 100
(पंतोजिनें शिकविणें शिकण्यास जावें) ह्याच्या पुढें

घेती सदैव नर नूतन भूमिकांना
रंगस्थलीं जगतिं खेळति खेळ नाना
संसार हा घरकुल्या परि सर्व आहे
मी मी म्हणे मनुज व्यर्थच गर्व वाहे ( १० )

हें बाहुलें मनुजरूप करीं धरिलें
दैवें सदैव जगती नर नाचवीलें
तो सूत्रधार हलवी कळ बाहुल्यांची
लीला जगज्जनक खालिं बघे मुलांची(११)
तों सारखें बघत सर्वहि लेकरांना
चित्तीं न अल्प अवकाश प्रतारणांना
मातापिता प्रकृति पुरुष रूप आहे संस्कृतींत
प्रेमप्रवाह मुलगा मुलगींत वाहे समदृष्टि मुलां मुलींना ( १२ )

जाई जुई व्रतति लावितसे पिता तीं
तैसे तरु सकल सौरभ अर्पिताती

तो बागवान जरि एकच देई पाणी
तेथें तरु फुलति आणिक फुलराणी ( १३ )

कुंजा मधें अनुसरून निसर्ग भावा
आल्या कळया प्रथम आणिति पुष्प भावा त्यांतुन दोन गळल्या मृदुपांकळयांच्या

झाल्या विलीन उरला स्मृति गंध त्यांचा (१४)

* insertion
झाल्याक्रमें मज सहा मुलि एक ।
विश्वास ये न मज कीं , मज पुत्र झाला ॥

टाहो पडे श्रवणिं मंजुळ गायकाचा ।
वाटे न कीं ध्वनि असे शिशु कोकिलाचा ।
(मैना असेल गमले मज सातवीती ।)

वाटे असेल मज सातवि ती बाळ मैना ।
येईल पोपट असे मनिं संभवेना।
कीं पूर्विची उडुन एक घरांत आली ।
साळुंकि की चिरमणि प्रेमळ पाळलेली ॥

धांवून ये मज म्हणे मम माझि माय ।
झालें विचारि तिज मी कथ काय ? काय ? ॥

अत्यंत फुल्ल वदनांतुन शब्द ' नातूं ' |
मी ही विचारि जननी खरं सांग ना तूं ॥

पण डोळ वटारून वटारून मी पहायां ।
लागे , दिसे मज खरोखर बाळ राया॥

साशंकवृत्ति किति  दा मी परतून पाही ।
खात्री बन्याच उशिरा पटली मनाही ॥

येतां नवें कुसम हें मम नंदनांत
 झाल्या निमग्न तनया अभिनंदनांत
टाळ्या मधे उपवनांतिल बालदेवी
त्या गर्जनी जय जयार्थ कृती पहावी ( १५ )

आला मुल म्हणति सुन्दर भाउराया
गेल्या प्रसूति गृहिं सोनुकल्या पहाया
वासून आ बघति ताणून कोणि डोळें
हे कोण येथ अपूर्व भाळे
हा पाहुणा चिमुकला नव्हताच काल
आला कुठून न कळे म्हणतांत बाळ
भाळे न हर्ष ह्रदयांत तसू तसू ला
डोळे भरून बघतां नवख्या शिशुला ( १६ )

पाठीवरी कुणी जिच्या देई  हळु पाया
ती इंदु सस्मित बघे निज बंधुराया
प्राज्ञा असे जिला न मुळिं बोट हि लावण्याची
बोटें तिच्या उमटती परि पाठिं पांची ( १७ )

ही न रडे जरि इला पडला रपाटा।
ती घेउं दे न हंसण्यात कुणास वाटा
सांगेल कारण कशीच लहान बाळा।
वाटे तिला मजसि केवळ भाउ झाला (१८)

मोठ्या मुलींसहि कळें न रहस्यबीज।
त्यांना कळे प्रथम होइल भाउबीज
नातू हवाच म्हणते मम वृद्धमाय।
त्याहूनती अधिक तें म्हणणार काय॥ (१९)

पाठीवरी पडतसे कर कुंकुमाचा।
तो पार्श्वरक्षक मुलीस असे भाव त्याचा
संसारमार्गि पथदर्शक हात त्याचा।
काठी धरून करांतिल ( करी ) धरील पुढें पित्याच्या
हातास ज्या धरून बाळ शके चलाया।
देई तयास जरठा जनका धराया ( २० )

(त्यालाच बाळ सरसावि पु ढें धराया)
अपूर्व जननीसगमे ठेवा मिळाला
माहेर सासर मुलीस करावयाला
जातील भुर्र कधि तरी चिमण्या उडाया
येतील वंशतरू आश्रयिं त्या बसाया

राहील दार हि सदा उघडें घराचें
होतील खेळ कीं नव जीवनाचें
स्फुरे जननिच्या मुदितांतरांत
वाटे तिला उगवली   नविन प्रभात
नाही मला म्हणतती अभिमान कांहीं
ना मागता जरि दिलें असुरे सदाही
तू लाज जन्म भर राखच देवराया
हें पांघरुण असुंदे मज पांघराया

—---
Page 103
जेथें पळे एक भांडुन त्याला धराया दुजा मागुनी धांवतो ।
सासष्ट तेंतीस कीं आंकड्यां चीं विरोधात लीला अशी दावतो
तात्पर्य
छत्तीस अंकापरी विरोधी कुटुंबें जरी राहती विन्मुख होतील त्रेसष्ट अंकां परी तीं दुजाभाव त्यागून कीं सदा सन्मुख
—----
back to Page 86

# ये आफिसातुनि  पती थकुनी घराला

ये ऑफिसांतुनि  पती थकुनि घराला
डोळें कुठे करिति कोमल स्वागताला
ती तोरणे नयनिंची उडती अमूप
सौभाग्यमूर्ति बघतांच पतिस्वरूप ॥ १ ॥

' जा रे ! गड्या , उचल सत्त्वर पाय गाडी
हा हुश्श हुश्श करूनी कपड्यांस काढी
तों ती शिरा करूनि गोड तदर्थ आणी
ते गोड हांत सुरु त्याहुन गोड वाणी ॥ २ ॥

आणी करीं कप बशी करूनी चहाला
ओतीत केरलंतुनी मधुरामृताला
कानांत ओतुनि पुन्हा मधुशब्दधारा
हास्यप्रभा हंसविते गृहसूत्रधारा ॥ ३ ॥

सर्वांत गोड मग आग्रह होउं लागे
डोळे तिचे गरगरीत भरीति रागें
घ्या घ्या नकोच इतकंऽ तरि खावयाचं ऽ
हें काय हें असंऽच करावयाचं ॥ ४ ॥

कां खिन्न आज हंसुनी पुसता पतीतें ।
ती खिन्नता सहज जाय दिगंतरातें ॥
Page 87
ऐकून भाषण पवित्र पतिव्रतेचें।
हेलावती मनि तरंग सुधारसाचे ॥ ५ ॥

आंणी कडेवर पुढें मग गोड बाळा ।

दोघी मधे धरितसे आपला जिव्हाळा ॥
किंवा समर्पण करी शिशुरूप ।
ज्याचा असे हृदयिं वास भरून गेला ॥ ६ ॥

जेव्हां असे सकल गोडय गोड आणी ।
तेथें फिकी पडत षड्रस मेजवानी ॥
आराम खुर्चिवर घेऊ नि बालकाला ।
लागे बघूं पडुन सुंदर बाल लीला ॥ ७ ॥

पंखा करीं धरूनि ती मग घालिं वारा ।
त्याच्या वरी वरून वर्षति प्रेम धारा ॥
तोंडावरील अति उन्नत भाग तीन ।
हल्लें तिथें चढवि बाळ कला प्रवीण ॥ ८ ॥

तो कान ही धरून ओढीतसे पित्याचे ।
तेथून नाक मग अग्र धरी मिशांचे ॥

जों जों करी कशि बशी सुटका पिता तो ।
काढी करामति नव्या शिशुवीर तों तों ॥ ९ ॥

दोन्हीं कडून भडकावुनी श्री मुखांत ।
जेरीस आणित असे जनका क्षणांत ॥
ओढी मिशा मधुन घेउन गालगुच्चा ।

तो खोडसाळ शिशु द्वाड लबाड लुच्चा ॥

देई शिव्या अणिक बाप करील काय ।
पोटां धरून हसण्यां लागतं काय माय ॥
तों बाळ देत हिसके मग जानव्याला ।
त्यानें मनांत किति व्याकुळ बाप झाला ॥

खालीं चुकुन करि तो मग मस्तकाला ।
शेण्डी करीं धरू नि तो हलवि पित्याला ।
झेण्डा करी सर शिरीं शरीरावरील ॥
वीरत्व हें कोण जगीं करील ।
कोण असलें जगिं गाजवील ॥

तोंडात तो शिरकवून करांगुलीला ।
फुर् फुर् करी धरितसे हलत्या जिभेला ॥
नाचे उरावर जणूं सरशी मिळाया ।
मी जिंकिलें जणुं म्हणे मा बाल राया ॥ १० ॥

तों बंधनीं जरडिलें शिशुला कराच्या ।
क्यां क्यां ध्वनी निघतसे मुखिं कोंकराच्या ॥
लागे जरी फडफडूं तनु पांखराची ।
बोटें गजापरि परी कर पिंजराची ॥ ११ ॥

काढी करामत नवी करि देहधर्मा ।
मारी कपालिं कर बाप बघून कर्मा ॥
बोले ' कबूल ' हरलो जगदेक वीरा ।
'शाबास ' ' धन्य' म्हणते जननी कुमारा ॥ १२ ॥

काखेत घालुनि करा उचलून बाळा ।
लागे पटापट  मुखा मग चुंबण्याला ॥
Page 89
आई दाविती पराक्रम हातवारे ।
'केलं  म्हणे ' छबूकल्या ', किति छान, वा रे ॥ १३ ॥

दोघे पुढें बसति घालुन खालिं मांडी ।
ती बोर्ड मांडि मग कॅरम डाव मांडी ॥
गोटा सभोंवति मधोमध लाल राणी ।
राजा समोर बसली गृहराज्य राणी ॥ १४ ॥

ती घेउनी प्रथम स्ट्रायकरा करांत ।
ताणून ती भ्रुकुटि दाबुनि ओंठ आंत ।
मारी हळू टिचकि तर्जनि आंगठ्यानें ॥
हा घाबरे बघुनि तें जरि वीर मोठा ।
वीरश्रि पाहुनि थिजे पति गारठ्यानें ॥ १५ ॥

पॉकेट आक्रमिति सत्वर तीन गोटा ।

होय शीघ्र हतवीर्य सुवीर मोठा ॥
तो फार यत्न करूनी धरि मारि नेम ।
जो एकदा कचरला जगि त्या न क्षेम ॥ १६ ॥
तों ये तिथे हंसत तो  मग तिचा शिशु पाठिराखा ।
त्यांच्या मधी विकसला नव बाल शाखा ॥
त्याला म्हणे जनक 'ऐक, नको नको  रे' |
आकुंचन प्रसरणे स्वरांगुलीच्या
आकुंचन प्रसरणे निजलोचनांच्या
आई पुढें वितरतात लहान पोरें ॥ १७ ॥

बापास ( /दादास ) दे न मुळिं दाद हंसे वरून ।
दोघा पुढें जनक जाय पुढें थिजून ॥
त्तो दे हळू चळवळया ढकलून गोट ।
येतां नवी कुमुक ती अति होय धीर ॥ १८ ॥

Page 90
केलें सुजर्जर तिनें प्रतिपक्षियाला ।
(झाला तिचा जय अलभ्य जनेतराला)
किल्ला करी सर अजिंक्य जनेतराला ॥ १९ ॥

बाहेर सर्व दिसती पतिच्याच गोटा ।
सारा नफाच इकडे तिकडेस तोटा ॥
पाकेट होति पतिचे घरिं ते रिकामे I

स्त्रीच्या अधीन घरची सगळीच कामें ॥ २० ॥

पूर्वी तसे हरविले निज बालकानें ।
आतां असें गृहिणिच्या कर लाघवानें ॥
अंतगृहिंतिल जया हुनि हार मोठी ।
वाटे तया पडति  हारच परन्तु हार कण्ठीं ॥ २१ ॥

रात्री कधी जाता पुढे फिरति दंपति शुक्र चंद्र ।
किंवा कवींद्र प्रतिभा शचि आणि इंद्र ।
जेवी करीति गगनी पवनीं विहारा ।
बागेंत तेंवि फिरती पति आणि दारा ॥ २२ ॥

Page 91
बाळाकडे वर फुला परि फूफलराणी ।
घेई;  खगा परि वदे शिशु गोड वाणी ॥
 नादांत त्या तरुलता डुलती वनांत ।
मनीं त्यांच्या प्रतिध्वनि  तरङ्ग भरे मनांत ॥ २३ ॥

जा जा पळून गणितज्ञ (  कु / ) सुतर्क शास्त्री ।
येवो तशी न कलही कुणी कर्कशा स्त्री ॥
येवो इथे कुणि न आचार्य ही इथुन व्याकरणज्ञ जावो द्वाड ॥
येवो न नीरस कुणी पति पत्नि आड ॥ २४ ॥

संभाषणीं उभयतां किति दंग झाली ।
त्या वाङ्गमयांत रसतन्मयता बुडाली ॥
भुंग्या परी अधर - संपुट माधुरीचा ।
ज्ञाता शिशु सुरस मधुप भाव पदावलींचा । ॥ २५ ॥

वर्षाव त्यावर क्रमें करिती मुक्यांचा ॥
गुं गुं मुका शिशु करीत रसज्ञ त्यांचा ।
सूं सूं मुखें शिशु करी सुरु शीत वारा ॥
भुर् भुर् करून उडवी वदनीं तुषारा ॥ २६ ॥

डोलून बाल गज तो उसळे मधून ।
जाती तिला गमत तोल कधीं चुकून ॥
Page 92
सांभाळिते परम चपल चञ्चल बालकाला ।
ती आवळून धरिते शिशुला उराला ॥ २७ ॥

वेली परी मग शरे सुन मण्डपांत ।
कीं भावमूर्ति खुलली मृदु कल्पनांत ॥
मांडीवरी रजनिशी शशी निष्कलंकी ।
बांका वरी बसत घेऊनि बाळ अंकी ॥ २८ ॥

तों येउनी बसत सन्निध कांत तीच्या ।
गोष्टी सुरु गुलु गुलू पतिच्यासतीच्या ॥

संवादमान बसला पति पत्नि जोडा।
ती कादिते मग डबीतुन वेलदोडा॥
तो ती धरीत चिमटींत करांगुलीच्या।
(वेली परी दिसति /) शाखा करांत जणुं मूर्त विलायचीच्या॥
त्या वेळी मंजुल ध्वनी सुरु बांगड्याचा।
शाखेवरील जणुं ( पिलाचा ) उडत्या खग शावकांचा॥

Page 93

सोलून ती धरितसे चिमटींत दाणा।
तो हात ना पसरितो पति जो शहाणा॥
' अं हः ' म्हणे पसरि ' आ' पण फार मोठा।
चित्रांत भाव दिसला अगदींच खोटा॥
ती हात उंच करिते वदनांत द्याया।
आपाद मस्तक थरारून जाय काया॥
तो दावितो अधरि मूठ करांगुलिची।
मोठे पाणीं अधर संपुटि चोखण्याची॥
हातास देत हिसका मग मान नाचे ।
झाले नवे सुरु प्रकाररि पाहण्याचे॥
त्याच्यांत राग अथवा अनुराग होता।
त्याचा तिथे पतिच केवल भावज्ञाता॥
मांडीवरी उचलुनी कवळी मुलांला।
वैषम्य वाटत असे पतिच्या मनाला॥
घेई पुन्हां कवळुनी अति गोड पापा।
वाटे उगीच पण मत्सर काय बापा ?

तीची बघून पुनरुक्ति पुन्हां पुन्हांती ।
त्यांच्या मनीं प्रगटल नव भाव नीती ॥

from Page 135 to 139 insert here

Page 135

बोले तिला हंसुनि काय तुला करावे ।
बाळा उरास कवटाळणी नित्य घ्यावे ।
त्याचेच लाड करिशी  पण लाडके तूं ।
याच्यात सांग तव काय परन्तु हेतू '।
' हा आपलाच शिशु भाव मनीं  धरावा ।
हेवा मनांत असला मग कां असावा' ।
' माझा खरा पण मुलाहून वेगळा मी ।
नेशी  मला न शिशुच्या परी प्रेम धामीं' ।
'कांही तरी म्हणुनि हें चिडवावयाचं ।
तोंडास ये  हवं तसं म्हणावं याचं ।
माझे कधीं न रुचते तुज बोललेले?
तैसे रुचेन तुज मी जरी कांहिं केलें ।
हें बोलतां हळूच कीं मग 'पिच्च ' झालें।
ते सांगणार न तुम्हां जरि कांहि झालें ।
रोमांचितापण तिची मग झाली काया ।
दोघे तिथून उठले घरिंअ सज्ज जाया ।

Page 136

'येई घरी मग स्वतः करिं पाट पाणी ।
ठेवीत पाय वदनास धुण्यास पाणी ।

टॉवेल साबु सगळे जिथल्या तिथे तें।
पाहून ती परत आंत घरांत येते।
आता नसे गरजती पळी ताम्हणाची।
नाही म्हणे गरज ते मुळिं मांडण्याची।
ठेवीत जांब अति स्वच्छ चकाकणारा।
पाहो खुशाल अपलें मुख ( वदनास) हि जेवणारा।
खांद्यावरून रुळत्या हलत्या पदरा धरून।
काखेंतुनी वळवुनी उजवी कडून।
देऊन एक हिसका निज कंधरेला।
डावीकडे पदर खोशित कंबरेला।

पिंड्या समान बुचडा शिरिं रेशीमा चा।
सोडी, विचार करि आवळ बांधण्याचा।
लीला विलास अती उंच अंगुलींचा।
झाला विमुक्त मग केश कलाप तीचा।
पाठीवरी पसरला सगळा पिसारा।
त्यानं नितंब तट झाकुनि जाय सारा।
ती नाचण्यास जणूं काय उभी मयुरी ।
जीची असे पदगती लय युक्त सारी।
अंगुष्ठ तर्जनिसताणुन केश पुंजा।
गुंडाळि तो सकल केश क्षणांत पंजा।
ती वर्तुळा कृती पुढें बुचड्यास बांधी ।

योगी हि लावील जया बघुनी समाधी।

खोंवी  मधोमध सुवासिक एक फूल।
खांद्यावरीच बसले जणू काय मूल।
वाढावयास लावता शिर खालिं त्याचा।
जावो सुवास भरुनी हृदयीं पतीच्या।

कांही बटा पळपुट्या  कळपा मधून।
भालावरून वरच्या वर सावरून।
बोटास ती फिरवि केश कलाप भागीं।
ती नीट नेटस अशी दिसली शुभांगी।

बांधून घट्ट   बुचड्या वरती आघोळ।
ती सांवरून लुगडे करी नीट घोळ।
खांद्यावरून किति वेळ वळून पाही।
कटिंखालिं आपादपट्टी ( काठ ) ढळली ना कुठे जराही।
मागील पट्टी न कुठें ढळुं दे जरा ही।
पट्टी ढळो न इकडे तिकडे जरा ही।

वाढीन मीच म्हणते मग वाढप्याला।
हें काम योग्य दुसऱ्यास न सोंपण्याला।

वाढीन मी तरच खातिल दोन घास।
त्यांना नकोच दररोज असे उपास।

Page 137

तू ऊंन ठेव बघ अन्न रुचे न थंड।
तूं घालविस्तव इथें वर ठेव गुंड।
कां लोणचे न करिशी किसुनी मुळ्याचे।
लिंबू वरून पिळुनी अति आवडीचे।
दाणे न घालुनि तुम्ही करिता सार।
बाई तुम्ही अगदि काम चुकार फार।
भांड्यात कां कलईच्या न पदार्थ काढो ?
की तोच तो परत शिकवु आज पुन्हां पहाडा।
कांदा लसूण तुम्हि घालुनि फोडणीला।
देतां न ओळखि तसां जणुं आवडीला।
गर्दी अशी सुरू असे गृह देवतेची।
जाणीव जीस अपल्या पतीच्या रुचीची।
उत्फुल्ल हास्य वदना मृदु भावपूर्णा।
साक्षात् उभी जणुं खरोखर अन्नपूर्णा।
' मी घेतले, कळव जा बरं, वाढण्याला।
बोलाव तू रे ,म्हणुन सांगत असे गड्याला।
पाटावरी प्रणयमूर्ती स्वपतीदेव विराजमान।
पाहून ती विसरली क्षण देहभान |
झाले बघून विसरे क्षण देहभान।

बांधून कंबर सुसज्जित शीघ्र पूर्ण झाली ।
वाढण्यास अथवा लढण्यास आली ।

डाव्या करात जणुं झांकणी ढाल घेते ।
वाम इतरांत तलवार पळी धरीते ।
झेलीतसे करतलावर झांकणीला ।
वाढावया डुलत ये रमणी सलीला ।

अङ्गाग ही प्रतिपदी (स्फुर) डुलण्यास लागे ।
पायांस घोळ इकडे तिकडेस लागे ।
आली हळू थबकली लवली क्षणांत ।
प्रेमात आर्द्रमन, निर्भर ( ईक्षणांत) वाढण्यात ।
तों होति तिर्कस तिच्या भिंवया कशाला ? ।
वदना अवलोकण्याला ।

डोळयांतले अमृत पान असे कराया ।
जेव्हां मिळें सुरसतें हृदयैक राया ।
त्याच्याबरोबर मिळे चटणी स्मिताची ।
सांगू किंती तरी असे चव जेवण्याची |
'गर्दी कधी न करू देइन जेवण्यांत ।
जी नेहमीच दिसते मज वागण्यांत ।
लागेल अन्न हळु खाल तरीच आंगीं' |

'आज्ञा कबूल '  म्हणता हंसली शुभांगी' ।
लावीत  सांडशि तिची गळफास गुंडा ।
 भाता हळू उकरितो पळिचा हि दांडा ।
 देना मुळीं तुटुं कण्या  किती मोकळया त्या ।
कीं त्या कलां विकसल्या हृदयीं कळयांच्या
किंवा  म्हणा चुगविण्या (पति) निजराजहंसा ।
काढीत मौक्तिक कलाप सतेज जैसा ।
 'हंस ध्वनी परि सुरू रव बांगड्यांचे ।
 होईल हंस वश शील समान ज्याचे ।
चाले 'सुसज्जित अशी पदमंद ठेवी ।
 कोणावरी न  जयती मिळवील देवी ।
झालो 'सरेंडर ' म्हणे आपल्या विद्ध मनांत ।
भाषाकळे विजयिनिस  हि मानसांत ।

Page139

घाली तसे झपझपा किती येर झारा । पानातला नसरला कधीही पसारा ।
हे खा अवश्य शपथा मग घालते ती ।
घासावरी नकळतां किति घास जाती ।
 सीमा असे जरि पदार्थहि वाढण्याची |
 सीमा परन्तु उदरांत भरावयाची ।
झाले असो सुरस भोजन एकदाचे ।
जें चाललें सतत काय जणों (कदाचे/) कधीचे ।

ताटांत त्या बसलि ती मग जेवणाला ।

घाणेरडा कुणी म्हणोत प्रकार झाला ।
वाटे तिला हृदयदेव सुतृप्त  झाला ।
मागून हा मग प्रसाद मला मिळाला ।

कोणास वाटत असे पति देव आहे ।
कम्पॅनिअन्   म्हणूनि कोणि कुणास पाहे ।
कोणी गुलाम समजो अपल्या पतीला ।
कोणी परी न दुखवो अमच्या सतीला ।

धर्मार्थ काम रुळती पदिं प्रेमळ जोडण्यांच्या ।
नाहीं सुखास असल्या जगिं जोड त्यांच्या |
ज्याच्या जेथें परस्पर सुखार्थ झटतात काया ।
येते तिथें भुवन सुंदरता रहाया ।

आले पुढें शयन मंदिरिं भाग्यशाली ।
माना तरङगिणिसती पति ऊर्मि माली ।
ती नेहमी हंसमुखी अतिरम्य मुद्रा ।
पाहू न येत भरतें हृदयीं समुद्रा ।

किती असे विमल मंगल भावगङ्गा ।

चित्तीं  तरंग उठती किति त्या प्रसंगा।
वक्ष:स्थळीं जणुं तटावर दोन हंस |
पाहून जाय धरच्या पती ईर्ष्या न येतिच्या  मनात  मानस राजहंसा।

लागे गणीत शिकवू मग तोस तीला।
पाटीवरी धरित ती करिं पेन्सिलीला।
अंकांचि मी मिळवणी शिकवीन पूर्वी।
घे तूं धडे रवि न जो उगवेल पूर्वी |
तू मांड अंक पहिले बघ नीट खाली।
तू होतांच हे मिळवणी बिनचूक झाली।

बेरीज येइल बरोबर ती करावी।
माझ्या अशीं जवळ तूं गणितें शिकावी।
सामान्य ना मज   प्रिये गणितज्ञ मानी |
तूं भक्तिभाव असूं दे गुरुच्या ठिकाणीं।

किंवा समीकरण मी शिकवीन जाण।
डावी तशी उजवी बाजू समान मान।
संसार बीजगणितांतील मुख्य भावा।
मूळार्थ आज मजपासुनि तुं शिकावा |

आहे इथे त्रिभुज मान समद्विबाहू ।
आधार हा वरुनि हा लंब  हि टाक पाहूं ।
रेखा गणीत असलें मग सांगु लागे ।
त्याच्या कह्यांत मग शिष्यिण गोड वागे ।

आणीन  नीरस अशा विषयांत गोडी ।
तू शीक आवड असो तुज फ़ार थोड़ी ।
याहून अन्योन्य मीलन रहस्यकथा प्रकार कथाया  |
जिव्हा न लेखनि तयार कुलीन बाया ।
ध्यानीं कुलीन तिज संभव बाळगून ।
त्या बोलतील कुली नीती कशा त्यजून ।

जोमी मी अंक शास्त्री म्हणूनि म्हणवितो
आपणा फार मोठा ।
त्याचा गेला लयाला क्षणभर टिकला सर्व तो गर्व ताठा ।
वाटेल त्याला, करावे गुरु मग आपल्या शिष्यिणी  स्वामिनीला ।
चाले लीला अशी तों दिनकर निमिषा आंत पूर्वी उदेला ।

येतां नाथ कचेरिंतून खळले जे ओघ चित्तांतले ।
सारे भाव रसात्म   एकवटले नाना प्रसंगातले ।
 आता ते परमावधींत विरले, अन्योन्य संमीलनीं ।
तों घाली हळु पांघरूण  वरूनी निद्रा जगन्मोहिनी ।

—--------

keynote" पुत्रजन्म " sequence

page 98 to  99 blank > 107 अ to 108 > Page 94 > 95 > 96 > 97 > 108 to 109 end

## पुत्रजन्म

Page 98

अनंत पडल्या शिरीं विमल विप्र मंत्राक्षता ।
तुम्ही लवकुशापरी त्वरित राम पावा सुता ॥
जरी मजसि वाल्मिकी सदृश वाटले ते द्विज ।
द्विजा ( शशि ) परि लपे परी नियति च्या धनीं आत्मज ॥ १ ॥

प्रभो पुरव आस ही मम पिता कितीदा वदे ।
मुल कर पुरे अता तरि मुनास तूं पुत्र दे ॥
विलंब न करी फिटो  जरठ दृष्टि चें पारणें ।
करीन अथवा तुझ्या जवळ येउनी मागणें ॥ २ ॥

वडील सुत भास्कर, द्वितीय चंद्र जाणा मज त्रिमूर्ति सम दत्त हा तृतीय धाकटा आत्मज ।
तिन्हीं तनय ते अम्ही जनक जातसे सुत अम्ही जगीं सोडुनि ।

धरास जणुं खांब ते त्रिगुण मूर्ति से लाउनी ॥ ३ ॥

त्रिमूर्ति वर सोडुनी सकळ भार संसार हा ।
प्रयाण जणुं वामनें गगनधामिं केलें पहा ।
( त्रिपाद ज्यु वामनी त्रिसुत रूप त्या पाउलीं थकून जगिं पाउलें सतत चालली माउली )
तिन्हीं तनय पावलें जगतिं तीन तीं पावले ॥
तदाश्रय करून ही घर कसें बसें चालले ॥ ४ ॥

मुलीस मुलगा हवा म्हणुनि व्हावया नातवा ।
करी नवस सासुही नयनिं आणुनी आसवा ॥
म्हणे भरिन ओटिं मी किति तरी खणें नारळें ।
तरी न जगदंबिका व कुणि देवही पावले ॥ ५ ॥

वडा सुरु प्रदक्षिणा शनि महात्म्य ही वाचले ।
उपाय उपवासही विविध रीतिनें चालते ।
(करीत महिन्यावरी जपहि बाल संतानती)
नसे जननि सासुच्या खटपटीस कांही मिती ॥ ६ ॥

मुलीस अपल्या म्हणे सतत माय एकीकडे ।
मुला स्तव तुझ्या मुली बनविले कधींचे कडे
मुली लवकरी अता दिवस तो उजडो तरी ।
सुधन्य मन नेत्र हो बघुन (तो मुलाच्या ) नातवाच्या करीं ॥ ७ ॥

Page 99 Blank

Page 107 अ

परंतु मिटले तिचें नयन ( ते अकालीं पुढे ) एकदा आपले ।
( सुधन्य मम नेत्र हे बघुन नातवाच्या दर्स ) पुढें
मनोरथ मनांतले मनिं तिच्या तसे राहिले ।
इमारत जगांतली  सहज ढासळे कोसळे ॥
न एकदम कांही ही जगिं घडे जरि मानि ती ।
तुटुन दृढ तंतु तंतु सुटीत जन्म गाठी किती ॥
पिले घरींच जगतिं सोडुनी - उडुनि जाय लावीण ती  ॥ ८ ॥

कुशसि तनये तुझ्या परत जन्म मी घेइन l
( मुलीस समजविते परतुन जगीं येइन )
अहो विधिगती म्हणा निजमनोरथाच्या वरी ॥
बसून परते ( पुन्हां परतती प्रगती स्वतां ) तनय ( रुप ती ) होउनी भूवरीं ॥ ९ ॥

स्वरूप तनु वर्ण तो  वदन तेंच ती ठेवण ।
घडे कधिं न ऐकलें जननि बाळ झाली पण ॥
अता अधिक जाहली सुदृढ गाठ ती पूर्विची ।
जुन्या लहरिला मिळे लहरि भावनापूर्तिची ॥ १० ॥ .

स्वतां जननि ला जणूं जननि घेइ  मांडी वरी ।
शिरीं पडति लोचनां तुन सुमौक्तिकाच्या सरी ॥
जुनी स्मृती मनां मधें स्फुरे तसे तरो काळवे ।
प्रवाह सुरू लोचनीं फुटतिं मानसीं काळवे ॥ ११ ॥

Page 108

( वडील जन बोलले सकलजे शुभाशीर्वच
फलास अथवा जणू जुने सरु येति उक्ति जुन्या
शुभोक्ति फलल्या जणू खटपटी पित्याच्या जुन्या )
दिवंगत पिता करी विनवणी विधिला वर ।
म्हणून अथवा इथें तनय पातला सत्वर ।
जमीनिंत जणू जुन्या रुजुन विप्र मंत्राक्षता ।
फळून मज अर्ति नवपिकास रचरूपी देती सुता ॥ १२ ॥

खरेंच पिक रूप तू प्रगटला वसन्तानिल ।
कळया विकसल्या उमलल्या घरी मदिय नन्दनीं निर्मल ।
मुली जमुनि भोंवतीं बघति वालकाच्या मुखा ।
जशा जुळुनि पाकळया खुलविती मधे कर्णिका ॥ १३ ॥
( याच्या  पुढें उशीर करूनी किती o )

Page 94

उशीर करूनी किती मजसि भेटला बालका ।
दडून बसला हिऱ्या अजुनि आज पर्यन्त कां  ॥
किती  तरिहि धुंडिलें विकल प्राण कंठांत ये ।
पुढें पण सुखे रहा कधिं कुठेच जाऊं नये  ॥ १४ ॥

परन्तु बसलो इथें थकुनि फार कांठावरी ।
भयंकर पुढें दिसे अति गभीर काळी दरी ॥
इच्यात जन जाउनी परतता न मी पाहिले ।

भयाण मुख ' आ' करी गडप सर्व ही जाहले ॥ १५ ॥

तरी पण तुझा मुला सुखद शीतल स्वर्श हा ।
तुझ्या नवीन जीवनें हृदयिं पूर येई महा ॥
तुडुंब भरिशीं जलें मदिय मानसाच्या सरा ।
तुझाच मम आसरा परम मंगला निर्झरा ॥ १६ ॥

अतां तरुसि वाळक्या नवनवी फुटे पालवी ।
पुन्हां बहरली मनीं सकल जीवनाशा नवी ॥
तुझ्यावर पडो परी सतत गर्द छाया वरी ।
परन्तु मम वृत्ति ही मधुनि होतसे घाबरी ॥ १७ ॥

Page 95

निरन्तर सरस्वती क्षितिवरी जरी वाहिली ।
तुडुंब भरली प्रभो मरुतलीं परी वाळिली ॥
विलीन मग जाहली अवनि गर्भिं सीते परी ।
मधे तशि सुको नदी न मम जीवनांची तरी ॥ १८॥

हितास्तव स्वतांचिया मुळिं नसे अशी मागणी ।
तुम्हींच मज जें दिलें करिन त्याचि मी राखणी ॥
तुम्ही उपवनावरी जरि असे मला नेमले ।
यथागति यथाबलें करिन काम मी आपले ॥ १९॥

कुसंस्कृत कसे असे कळतसे तुम्हां मन्मन ।
तुम्हीं मज दिले मला कठिण काम संगोपन ॥
तुम्हीं म्हणुनि हें स्वतां सकल पाहिजे पाहिले ।
म्हणो न कुणि ही तुम्हां उगिच कीं मला काढिले ॥ २० ॥

परन्तु तु म्हि घेतली सतत ही परीक्षा स्वतां ।
म्हणून म्हणतां नये कधिं तुम्हांस कांही अतां ॥
किती दिवस चातका परि असे समुत्कंठ मी ।
दयामय - घना तरी नवळला जरी मी न मी ॥ २१॥

Page 96

लहान किति लेकरें अजुनि जोडती ना करें।
न पंख फुटले तरे न उडती मुळीं पांखरें ॥
बधून मन बावरे शरिरिं कीं भरें कांपरें ।
असे सकल हें खरे कळतसे तुम्हाला बरें ॥ २२ ॥

परन्तु मज नेमिलें
म्हणून मज शाक्ति द्या हृदय दा जगज्जीवना ।
करीन घट घेउनी निज करें जलासिञ्चना ।
किती विमल बाल्य हे सहज चारू रम्य स्थितीं ।
जिथें न शिरली मुळी विकृत कृत्रिमा पद्धती ॥ २३ ॥

निसर्ग रमणीयता रुचिरनन्दनाच्या वनीं ।

अकृत्रिम कला हवी परम शोभनी पावनी ।
ना ठाउक कला मला वळण लाउ रोपां कसे ।
सदा प्रकृति चारुता टवटवे जयानें हंसें ॥ २४ ॥



हिरा मजसि सांपडे हिरकण्या मधें शोभला ।
कला निपुण कोंदणीं जडवितां नये कीं मला ॥
कलानिधि कलानिधे जडविला निळ्या कोंदणी ॥
नभीं मणि गणां गणीं भरत से जनीं लोचनी ॥ २५ ॥

तशाच शिकवा कला नवशिक्या मला निर्मला ।
अलंकृत करील जी नविन दागिन्यांनी मुलां ॥
महोत्सव जना मनीं बधुनि त्यांस हो लोचनीं ।
निरंतर प्रकाशुनी पथ दिसते जगाला वनीं ॥ २६ ॥

जगांत जगणें पुढें कठिण फार देवा असे ।
विलक्षण परिस्थिती न गरिबास कोणी पुसे।
म्हणून विनवी तुला सकल निर्धनच्याधना ॥
समर्थ मजला करा द्या तनय पोषणा वर्धना ॥ २७ ॥

जिवंत जगिं तो खरा जिववि जो जगाच्या जिवा ।
अशा जगविण्यास धा मज सि साधना केशवा ।
अशक्त कितिही जरी भरंवसा तुझा मी धरी ।

अशक्त जरि भी तुका भरंवसा मला निर्धना।
म्हणून उचलेन भी सहज भार गोवर्धना॥ २८॥

सुदीप गृह सातसा सुतदिवा घरीं पाजळी।
कुटंब परिवार हा न खडकावरी आदळो।
घरांत  जनतेतही भरतभू स हो तारक।
सुकाणु धरूनी करी तरोण वल्हवो नाविक॥ २९॥

तुफान उठलें तरी कधि न मावळो दीप हा।
नसे गगनि चांदण्या टवटवीत चंद्रा पहा॥
स्वतां रवि करें शशी गगनिं दीप सारो जसा।
सदा मजसि सारुं द्या तनय दीप देवा ( स्नेहें ) तसा॥ ३०॥

back to Page 108
(...... सदा मजसि सारू द्या )
कुटुंब परिवार , हा अखिल भार खांदा वर।
तुला उचलवो मुला सकल तू कुला उद्धर।
मनीं कळवळून तू स्वपर दुःख तें घालव।
कुणीहि परकीय सा न समजो तुला मानव॥ ३१॥

समाज समजो तुला  सतत तू समाजाग्रणीं।
मुला जननिभूमिच्या विलस दिव्य कंठी मणीं।
ललाम जगतांस हो शिव शिरावरी चंद्रसा।

मनुष्य म्हणवाव्या सतत पात्र हो राजसा ॥ ३२ ॥


स्फुरो हृदय सागरीं नव विकार नाना जरी ।
विकारवशता शिवो न तव मानसां ला तरी ॥
स्वतंत्र नियमांत तूं वस सदा अनुच्छृंखल ।
नियंत्रण करी खेला असे मनी परी शीतल ॥ ३३ ॥

बृहस्पति परी तुझी सुमति मानवो मानवा ।
सभेंत सगळ्या तुझी सतत ह्वावि रे वाहवा ॥
प्रभाव तव भासुंदे सकल अखिल पूर्वि वा पश्चिमी ।
अकृत्रिम रहा सदा परम निर्मला संयमी ॥ ३४ ॥

असो सुगुण बुध्दिने परम आगळा बाळ हो ।
कधी मजकडून मी तुझि न बाळ आबाळ हो।
करीन करूं जे शकें कधि पडो न कमी ना तुला ।
सुखी  करिन ठेउनी जिवगहाण आपुला ।
तुझ्यात मनमोहना विमलता असे गांधिची ।
गळ्यांत पडुं दे तुझ्या विमल मालिका कीर्ति ची ।
स्वदेशाहित साधनीं सफलता मिळो पावनी ।
करो असुर भस्मसात् कृति तुझी जगन्मोहिनी ।
बहुश्रुतपणा तुला टिळक बाळ गंगाधर ।
समर्पण करो रहा मत मतान्तरी च्यावर ॥

स्वतंत्र तव पद्धति कर विचार तू मौलिक ।
प्रवाह नव भाषणीं तव असोत  स्वाभाविक ।
कुणा न धरवो तुझा कर परोपकारा मधें ।
कुणा ने धरो तुझें वदन भाषणांच्या मधें ॥
कधीं न अडवो तुझ्या गतिस कोणी वाटे मर्धे ।
पळो सकल संकटें क्षणिं तुझ्या धडाडीमधें ।

पुराण इतिहास ही सकल  आपले वाचणें ।
परन्तु मळके जुने न कधिं फाटकें घालणें ।
जुन्यांतुनि  नवे निघे म्हणुनि तूं जुने आदरी ।
मराल (= राजहंस ) सम मानसीं धर विवेक तूं अंतरीं ।
परिश्रम करून जें मिळविलें कुणी पूर्वजें ।
सुरक्षित मुला तुलां  राखिलें पाहिजे ।
पुरातन कृति मधे जरि विसंगती वाटली ।
दुवे मधुनि जोड तूं कर सुसंगता सांखळी ।
परन्तु सगळे 'जुने ' न कधिं मान सोन्या परीं ।
जुनाट किडल्या अशा न कुणि तांदला आदरी ।
वडील जन पूज्य जों वर न बुद्ध साठी असे ।
नितांत परिपक्वता लय पथाकडे नेतसे ।
तसेंच सगळें नवे  न असतें खरें तें बरें ।
असे कठिण जाणणे जगतिं काय खोटें खरें ।
नवीन युग संस्कृति कि ति असे मन मोहिनी ।
वरून अति सुन्दरा हृदयिं पूतना मोहिनी।

जशी खर स्वसा ( = शूर्पणखा ' खर आणि दूषण दोघांची स्वसा (बहीण) होती ) सती बनुन सुंदरी राक्षसी ।
तशी समज तूं हिला परम राजसी तामसी ।

नारायणा तूं धरी रे सुकाणु सदा नांवही चालवी चालवी ।
( सुकाणु Marathi Meaning, Steering of a ship नावेचे सुकाणु धरणारा, नावेचेसुकाणुधरणारा. the helmsman of a ship's boat or a racing crew )
रक्षी तुफानांतुनी देव , देवा हिला नीर सांभाळ आहे नवी ।
प्रल्हाद कीं ची लया बाळ देवां ध्रुवाला तुम्हीं ना च सांभाळिले ।
मी राम ही नाम मात्रें असे की तुम्ही पाहिजे बालका पाळिले ।

—------
Page 110 blank
Page 111 blank
Page 112 blank
Continued after Page 104 - 107

Page 104

# फलश्रुति

६.१०.१९३५
जा ऐकवा या तया गीतमाला। जयाला लुटायास ठेवा हवा।।
हा या पावन भावनांचा खजाना ।' निधि ' हा नवा मानसी सांठवा सांठवा ।।

जेथें नसे शान्ति देवी घरीं तीं। सुरु रोज ची रोज तों भांडणी।।
त्याच्या घरी गाउनी रामगीता, करा पाठ, । द्या किल्मिषां हांकुनी ( / घालुंनी )।।

अंतर्गृहीं नीरसा जीवनाला। नवी गोडि लागेल ही ऐकता ।।
होईल भावांतल्या भिन्नतेची। स्वभावीं पुनर्जीवनीं एकता।।

जेथें तुटे तार मंजु रचनाची। सुरु नाद आंत संगीत काना करू ( / कडू )।।
झंकार धारा प्रवाहीं बुडाया कुटुंबात। लागेल ही आवडूं।।

जेथें विरोधी मनोवृत्तिची ती गती। तोडि ते कोमला बंधना।।
स्नेहाविना यंत्रचक्रें जिथें तीं। करीती किती कर्कशा गर्जना ।।

संसार - मार्गांत चक्रें रथाचीं ।जिथें चालताती विरुद्धें पथें ।।
ही रामगीता तिथें ऐकवीता ।लुटावीत स्वर्गीय - सौख्यें इथें ।।

सांगेल प्रिस्क्रिप्शना नेमक्या। ही प्रसंगानुसारें तुम्हां लागुनी ।।
सांगेल ही पथ्यपाणी तुम्हाला ।तुम्ही घालवा रोग तें पाळुनी।।

हा मंत्र कानांत देईल केव्हां ।कधीं पंक्ति काव्यातल्या धुंडुनी।।
तो भक्ति भावें जपा; तत्प्रभावें। कुटंबास द्यावे तुम्ही भारूनी।।



ज्याच्यामुखीं जें जसे ये वदीतो ।नसे त्याचि पर्वा मुळीही मला।।
कोणी ' कलानीति ' वादांत भांडो। मला पाहिजे ती कला निर्मला।।

शृंगार राजा रसाचा विराजे इथें । भावनामंदिरीं तो अहा।।
उत्तान अश्लील भावांस येथें। नसे ठाव आहे प्रतिज्ञा पहा।।

कांचेच्या पेटिच्या आंत जैशी। स्फुरे मौक्तिकाची नवी मालिका।।
मेघावलीच्या मधूनी स्फुरे ती। जशी वीज दिव्या कधीं चंद्रिका।।

कीं बल्ब दावी विजेच्या प्रकाशा। कराया उपाधी मधें ज्योति दिग्दर्शना।।
कीं मृगपद्मांत , शृंगार तैसा। करी शब्द गर्भीं इथें गुंजना ।।

—------

Page 106

# आई व पत्नी

( ७.१०.१९३५)

चिच्छक्ति ची जी कलामूर्ति माता पहा मन्दिरी अंतरीं ।
जी पल्लवाची कृपेच्या करीते शिरी सांवली बालकाच्यावरी ।

जी चालवी पांगळ्या लेकराही कराला धरुनी अशी माउली ।
दावी जरीती वरी राग खोटा केव्हां तरी आंत प्रेमांत ओथंबली ।

काढून केरा तळीं रोपट्यांच्या करी निर्मला नन्दनाच्या वना ।
पाजी केव्हां वरूनी पय प्रेम धारा मुखीं आला बालांत संवर्धना ।

केव्हां करी ती घरीं केरवारा मुलां खेळण्या स्वच्छ क्रीडांगणा ।
केव्हां गृहस्वामिनी ती घराच्या व्यवस्थे मधे दंग ; द्या दर्शना ! ।

केव्हां कुणाची सरी जीवनाची दिवा दिव्य संसारिं घेई करीं ।

त्याच्या प्रकाशात चाले कुणी वाट अंधारिं बाहेर किंवा घरीं।

गुंफुनती वाङ्गमया माळ ठेवी गमे श्रेष्ठ मंदार माळे हुनी।
भारून टाकून जी जीवलोकी भरे वास दाही दिशा व्यापुनी।

कीं दृग्विलासीं विकासांतलातो मधुप्राशुनी भुंग होतो कुणी।
हास्यप्रभेच्या नव्या चेदिकेच्या तरंगांत जातो कुणी मोहनी।

चालून चालून संसारमार्गीं झळीं तीं दुःखेशीर संतापुन।
तत्काल डोके असे थंड होतां सुधा प्रेम वर्षावो डोळ्यांतुन।

तात्पर्य

अभ्यागत स्वागताच्या प्रकारा मधें संशोधन।

वाटे गरीबां घरीं हे मिळाले मला निर्धना ( ) गुप्त क्षेत्रीं धन।

—----

Page 106 अ

blank

Page 106 ब

(२०.०६.१९३५)

# इटली ॲबेसिनिया  युद्ध

आंगांतील अनन्त तन्तुत तिच्या; जाळ्यांस कोळी विणे।

माशा आणि किडे उडून  पडती; त्याच्यांत यत्नविणें।

केन्द्रा आंत घाटांत तयास तार मिळतें ; कोळया कळे।

धांवे सत्वर मार्ग आक्रमु नि  तो; भक्ष्यास ( माशीस ) त्या आवळे।

दोन्हीं कोमल हात तो पसरूनी ; ओढून चुंबीतसे।
फांसाच्यावर त्यांस तो लटकवी ; काबूत आणी तसे। ( माशी बिचारी फंसे )

मायाजालविणून तो मग असा ;  केन्द्रांत जाई पुन्हां।
वाटे त्यांस न त्यांत कांहि मुळिं ही ; केला असा मी गुन्हा।

ऐशी ही व्यवहार नीति जगतीं ; अस्तित्व संग्राम हा।
कोठे गोर गरीब जीवन धना ; कोणी हरीती पहा |

ज्यांची भूक मती विशाल कपटी ; तो पाश विस्तारूनी।
' आम्हीं आज जिवंत राहु' म्हणती;  ' राहो न राहो कुणी'।

ऐशी ही जरि रीति नीति जगती; सर्वत्र ये पाहण्या।
देवा तूं तरि निर्धना उचलुनी ; वैकुण्ठ दे राहण्या।
(देवा तूं तरि पोटि लाव गरिबां;  वैकुण्ठ दे राहण्या)

Comments: Italy invaded Ethiopia on 03.10.1935, this was written on the initial days before the actual war broke-off. The war later concluded on 05.05.1936)

—------
Page 107
(०६.१२.१९३५)

# मुकें बाळ जणुं म्हणे पित्याला

मुकें बाळ जणुं म्हणे पित्याला । उचल खांद्यावरती मजला ॥ ध्रु० ॥

स्कंधीं तो घे अमृतघटाला
एक्या हाते धरि  वर त्याला
दुसऱ्या नें सांभाळी तोला
जनक लागला नाचायला ॥ १ ॥
शिशु फडफडवी उभय कराला
बाल शुका परि जणुं पंखाला
खिलखिल ध्वनि मुखिं मधुर निधाला
आई बहिणी बघती लीला ॥ २ ॥
बाल पताका वंशावरली
फडफड फडफड फडूं लागली
थय थय नाचें हलली डुलली
डोक्यावर शिशु वाजवि तबला ॥ ३ ॥
ताल गीत लय अभिनव चाले
प्रेक्षकगण तो सारा डोले
अमृत घट तो खुळ खुळ बोले
प्रवाह त्याचा घरी पसरला ॥ ४ ॥

Page 107 अ
see Text in continuity in पुत्र जन्म

continued from
Page 113

(०८.१२.१९३५)

# बिन्दु - प्रवास ( १ )

(Comment: पाण्याचा एक थेम्ब आकाशात असून दूसरा भूतलावर असतो, हा बिन्दु प्रवास वर्णिला आहे)

तूं कुठें नि मी कुठे अफाट अंतर।
बिंदु फार दूर मी असें इथें तर।
बंधु बिंदु भूवरी मी इथें वर।
तो जिरो न भूमि आंत त्यांस घे वर।
(सांग त्या रवीस पाठवावया कर)
मी ढगावरी बसून सोबत्या सह।
चालतां पथांत वायु तो सुखावह।
हिंडुन तरंगुनी असा नभीं वरी।
या विमानिं मौज पाहतो नभांतरीं।
मी दयाघना ! वसें तुझ्या कडे वरी।
येत मी हळू हळूच सिंधुच्या वरी।
पाहतां कडे वरून मारिली उडी।
झेलिती तरङ्ग हस्त लाविती उरीं।
एकरूप जाहला तुझाच अंश हा।
अल्पता मुरे विशालतेंत ती पहा।

—----

Page 114

# बिन्दु - प्रवास ( २ ) ( Comment : further journey of a water droplet )

(०९.१२.१९३५)

अन्य बिन्दु कांहिसा असाच चालला असेल वाढला।
तो सहायतेस बंधु वृंद धांवला।
बिंद वृंद त्यास देति जीवना नव्या।
हर्ष जाहला मिळून एक व्हावया।
एकरूप एक ध्येय सर्व चालले।
संघ शक्ति ओघ पर्वताकडे वळे।
मस्तकी पदास देति कोरिती नगा।
वाट काढिती पराक्रमें तुम्ही बघा।
पायथ्यास पाहिली नरी बहीण ती।
ते उड्या कड्या वरून खालि मारिती।
संकटांत भेटतात आई मानसें।
भाउ कीं बहीण जीं जगांत माणसें।
एक रूप एक मार्ग सज्ज जावया।
सागरात सासरास तीस न्यावया।
सर्व ती कठोरता तळांत दाबुन।
अर्पिताति जाग जागिं नव्य जीवन।
हांसवून खेळवीति वृक्षकांठचे।
अन्य भेटती बहीण  भाउ पांठचे।

Page 115

एकरूप एक जीव एक ध्येय ते 1
एकमाग एकचाल धन्य एकते !!!
पोखरून फोडुनी पहाउ कोरले।
येति आडवे उंच वृक्ष पाडिले।

वाळवंटि वाळु ही प्रवाहिं वाहिली।
शेतकी करावया जमीन निर्मिली ।
शौभिली जमीन ही सुमौक्तिकां मुळें।
कोठिही नवीन बाग डोलले फळें।
गर्जुनी सहर्ष तो जलौघ चालला।
एकरूप एक नामता हि पावला।
पात्र वाढतांच प्रेमभाव वाढला।
एकतेत सर्व कार्यभाग चालला I
घेउनी अफाट त्या सपाट भूवरी।
मूर्तती समानता धरातलावरी।
बिंदु तो कुठें तरी तसाच चालला।
मीच फक्त त्यास मानसांत पाहिला।
मीलनीं नदी मुखांत सिंधु रंगला।
अंतरंग वृत्ति भावकीं तरंगला।
Page 116
बिंदु एकरूपतेंत सिंधुच्या मिळे।
आपल्या जुळया हि बंधुला तिथें जुळे।
एक ध्येय एक मार्ग एक रुप हा।
बिंदु सिंधु रूप जाहला अहा पहा।
एक जाय उन्नतें पथें नभांतरीं।
अन्य जाय पार्थिवें प थें जरी, तरी।
एक ध्येय भिन्न मार्ग रोन जीवनीं '
एक होति शेवटींच सिंधु जीवनीं।

अध्यात्म भौतिक हि जीवन भाव नीती ।
लीला अहा उभय बिंदुहि दाविताती ।
दोन्हांहि रम्य अपल्या अपल्या परी तें ।
ध्येयार्थ  जें रूचत सें  मनुजा करीं तें ॥

—-------

Page 117 Blank

Page 118

(शरद्व्याख्यान माला उज्जैन १९३५ मधें म्हटली)

(१)

## धोंड नाहीं धोंडा स्त्रिया समजाव्या

धोंड नाहीं धोंडा स्त्रिया समजाव्या । जगिं अडवाया वाटे मध्यें ॥
पुराणेतिहास हें चि सांगतात । अपल्या चित्रांत आणावे तें ॥
शुंभ निशुंभाचा कसा नाश झाला । मोहिनी ची लीला ध्यानी आणा ॥
विश्वामित्र बैसे तपास कराया । गेले सारे वाया स्त्री प्रभावें ॥
सीतें मुळे झाला रामा किति त्रास । कांहीच लग्नास दिन झाले ॥
दशकण्ठ सीता घेउनि पळाला । सर्वनाश झाला लवकर ॥

(२)

भावाभावामध्यें द्रौपदीच्यामुळें । कसें काय झालें ठाऊकच ॥
अहिल्या व तारा म्हणे पतिव्रता । आख्यान पाहतां कळे सारे ॥
नरकासुराच्या स्त्रिया भ्रष्ट झाल्या । त्रिपुर नाशाला सुरुवात ॥
. उर्वशी रंभा म्हणे देवांगना । किति मुनि जना भ्रष्टवीती ॥
सुरुचिमुळें बाळ ध्रुव वना गेला । सांगू कृष्णलीला फार काय ॥
निर्गुण ब्रम्ह मायेच्या अधीन । पुरुषाबंधन प्रकृतीचे ॥

(३)

इतिहासा कडे करा दृष्टिपात । झाले रक्तपात अगणित ॥

संयोगिते मागे रणनिकंदन । मेले किती जन अभिमानी ॥

रजपूत स्त्रिया होळी पेटवीती । देहीची आहुती टाकिताती ॥

Page 119

घोरकृत्यै करी घोरी तो अघोरी । देशांत पाचारी जयचंद्र ॥

ठाऊक जें झालें पद्मिनी च्या पायीं । लोळे शगु पायीं हिन्दुस्थान ॥

कृति कर्कशेची आनंदीबाईची । ती पेशवाई ची कीड मूर्त ॥

(४)

व्यवहाराकडे थोड़ी दृष्टि द्यावी । तिथे हि पहावी तीच रीत ॥

कानि येता शब्द होइ सावधान । पडे नारायण रामदास ॥

आपखुषीनेही संबंध करून । आपणा बांधून घेई नर ॥

चतुर्भुज होतो शिक्षण बुडाले । तोंडाचें पळाले पाणी त्याच्या ॥

आधीं होता एक झाले आतां दोन । चारसहाजण पुढें आले ॥

पाहुण्यांना कोणी नाहीं बोलाविले । एकामागे आले एक एक ॥

(५)

जबर ते आले पाहुणे लहान । त्याना बोलता न चालताये ॥

रात्री झोंपे मध्ये उठवी पाहुणा । अरे नारायणा धांव आती ॥

पाहुणा हा झोंपे कडे खांद्यावरी । आता पुरे करी नारायणा ॥

त्यांना द्यावे काय पडे विवंचना । खरीं कांहींच न खाया द्याया ॥

घालविता ये ना ठेवविता ये ना । कांही देववे ना स्थिती अशी ॥

तोड तोड तोडी आईस तें बाळ । सदा सर्वकाळ घाबरेती ॥

Page 120

(६)

आंगावरी त्याच्या लक्तरे लक्तरें । करे तें कांपरे आंगामधें ॥

कसा बसा मिळे दर महा दहा । हा अनर्थ महा दहा पोरें ॥

x (~~आतां पुढें गुरु कव्यीस करीन । त्यामुळे तरेन भव म्हणा~~ )x

म्हणुनी मोठे मोठे इथें संसारांत । सदा राहतात ब्रम्हचारी ॥

धोंड नाहीं धोंडा स्त्रिया समजाव्या । तुका म्हणे भार्या मज दोन ॥

दोन्ही पत्नी माझ्या परमार्थाच्या आड। विहीर व आड दोन्ही बाजू ॥

—-----

Page 121

# मानस - गीत

(१९.१२.१९३५)

(सुनीत)

सृष्टीच्या हृदयांत नाद भरतो विश्वांत विश्वंभर ।

गुं गुं मानस - गीत गा मम मना ! नारांत त्या निर्भर ॥

जाऊं दे मिळुनी  तुझी लय गती ताना नभीं तूं भर ।

सृष्टीच्या रमणीय गीत लहरी - सिंधूस येवो भर ॥

मानो षड्ज कुठे हि तूं पण पुढे विस्तार संभाळुनी ।

सातो गुंफुनि गुंज नीं स्वरतती विश्वास दे भारूनी ॥

होवो ती स्वरसंघ संगति जशी भावार्थ संपन्न ती ।

ज्यानें सर्पहि दुष्टभाव त्यजुनी हो दुर्मती सन्मती ।

ऐको ना कुणी ही सुरुपण असो तुझीं कला निर्मला ।

सृष्टिच्या करि कोकिला प्रगटी गीतस्वरा मंजुला ।

तुझ्यानंतर जीवनांत अथवा गाईल कोणी तरी ।

वाऱ्याच्या वरले तरङ्ग ध्वनिचे आनंदु नी अंतरीं ।

चित्तीं हाव धरूं नकोस जगतीं कीर्ती मिळो ना मिळो।
गा, गा, तू पण आपला तव कधीं उत्साह न मावळो।

—---
Page 122
(२०.१२.१९३५)

# कोणी काढिति धुंडुनी

कोणी काढिति धुंडुनी अजूनिही पौराणिकी  सत्कथा।
लीला त्या प्रभुच्या पुरातन पुन्हा, त्या त्याच त्या ऐकता॥
कंटाळे जनता अतां मुळिंच कीं नाविन्य तेथें नसे।

यांची कल्पकता ठरवी परिधी कक्षेमध्ये ती असे
पुष्पांचे हसणे सुगंध कमळे भृंगाची ती मुग्धता
किंवा तो मुखचंद्र अन्य उपमा कंटाळलो ऐकता
सारे विस्तृत गोल दिव्य मणि हे सूत्रांत जी गुंफिते
ती चिच्छक्ती  कला विहार करिते सर्वत्र ती खेळते
तीचे खेळ अनेक ती स्थिर चरीं क्रीडांगणीं नाचते
किंवा रम्य म्हणा निसर्ग रमणी विश्वांतरीं शोभते
वर्णावे म्हणूनी  अता प्रकृतिचे अन्योन्य संबंध ते
होती बिंबित भिन्न जीवनिं  जगीं तें वर्णुं दे देवते
घ्यावा नित्य कथा नवीन प्रतिभे चिच्छक्तिच्या त्या कला
वर्णाया निसर्गनिर्मित कृती साहाय्य दे तूं मला

—----
Page 123
(०३.०१.१९३६)

# आज कुठें निजशिल  आई

आज कुठें निजशिल  आई निज ना इकडे आज।

निजु दे बाळा बाबा जवळ  ।

पोटाशीं तूं मज ग ऽ ऽ  कवळ।

इकडुनि तिकडे मुळिं न तूं वळ।

तोंड रात्र भर असुंदे इकडे मी न तुझी का बाळ।

म्हणशीं जाइन कधिं ना उठुनी।

पण चोरून मज हळु ना कळुनी।

गेलिस काल बघितलें उठुनी।

माझा डोळा लागायची बघशी वाटे वाट॥

—---

Page 124

blank

Page 125

# पोंच

(तांब्यांच्या सगग्र कवितांचीं)

तुम्ही धाडिली , मला पोचली , वस्तु किती ही थोर !

योग्य काय मी या भेटी च्या ?

विचार केला अधिकाराचा ?

माझ्या पात्र अपात्रत्वाचा।

अथवा प्रेमा दिसते उज्ज्वल अगदीं काळे भोर।

भास्कर - तेजाचीही मूर्ति।

जी सारी नभिं चंद्र - ज्योती  ।

आली मानू खाली कांती ।
ज्याने पुरती व्हावी माझी चंद्राची ही कोर

—- राम चंद्र

Page 126

## पोंच ( २ )

(०४.०१.१९३६)

' समग्र-कविता' तुझी जरि म्हणूं मला पावली ।
पटे भरंवसा न कीं ती कलाकृती संपली ।
तरंग जलधीवरी - उसळली किती, नाचती ।
तुषार कण फक्तते अवनिच्यातटा लाभती ।
दिसे न रवि ला हि जें सुकविदृष्टि ने पाहिले ।
असेल बघणें कसे अजुन हें तुझें संपलें ।
असोत उघडीं तुझ्या हृदयंच्या वनीं ' लोचनें' ।
निसर्ग नव वैभवा सतत तूं अम्ही दावणें ॥

—----

Page 127

## एक गंमत

(०४.०१.१९३६)

थकुन भागुन मी घरीं परत आलो ।
पलंगाच्यावर स्वस्थ झोंपिं गेलो ॥
मुले अंगणिं तीं खेळताति खेळ ।

तिन्हीं सांजाची कीं असेल वेळ।

चुळबुळीला सुरुवात प्रथम झाली।

गुर गुरे कुणिं वाटलें मला खालीं।

म्याउ म्याऊ कुणि लागले कराया।

करित ' शुक शुक ' मी त्यांस हांकलाया।

हळुच डोकीं तीं उंच वर निघालीं।

' सुशी ' ' तारी' ती ' इंदु' क्रमें आली।

हळुच रांगुन तो बाळ येई मागे।

टक टका मी बघण्यांस त्यांस लागे।

नंदनाच्या बागेत पर्या बाल।

प्रगटुनी त्या नाचती देति ताला ( टाळ्या )।

हंसुन म्हणती कां कशी मौज आली ? नवीं हंसण्याची पिकें पुन्हां आली।

—----

Page 128

## मुलास पत्र

(दिनाङ्क: १८.०१.१९३६)

माझें औषध पाणि सर्व जरि ही वाटे बरें चालले।

येती येथ खरोखरी मजक सें सांगू बरें वाटले॥

आहे सर्व इथें व्यवस्थित हवा - पाणी असे ते बरें।

जावा दीर नणंद माझी करती सेवा खरें हें बरें।

तुझ्या आठवणी परन्तु रुतती कोट्या परी अंतरी।

बाळा कालवते मनीं किति लिहू होतें कसे सें तरी।

' सैपाकीण नवीन ठेवलि' तुझ्या पत्रांत मी वाचतें ।

आतां रात्रच वाटते कशि अतां मी येथ कीं वाचतें ।

गेलें घाबरूनी कशास न कळे वाचून हें दाखव ।

त्यांना सांग ' घरांत घूस टवळी ठेवूं नयें'; घालव ।

कोणी मोलकरीण ही न घरचा माझा चढो उंबरा ।

या बाया घरिं नासधूस करिती ; ' दुर्गाच' आहे बरा ।

आहे तो ' हरिसिंघ' त्यास असुंदे , सैंपाक ही तो करो l

सोन्याच्या अपल्या घरीं अवदसा कोणी कधीं ना शिरो ।

—----

Page 129

(दिनाङ्क:१९.०१.१९३६)

# माझे ते मज वाळकेश्वर

माझे ते मज वाळकेश्वर प्रभो सौभाग्यमूर्ती असो ।

माझे  नाविक नांव ही जगतिं ते कीं वल्हवाया वसो ।

छाया आणि तरु प्रभा शशि परी एकत्र राहो अम्ही ।

माझे जे लखलाभ ते मज असो हो कोण सांगा तुम्ही ?

माझे ते जगिं देव, चित्तिं मजला ते मानिती देवता ।

त्यांच्या सन्निध वाटते मज इथें स्वर्गीय सौख्यार्थता ।

त्यांचे हास्य तरंग देई भरूनी ही ( मज्जीवनाची / )जीवनाची नदी ।

संसारातील सर्व एकवटती सौख्यें पतिच्या पदीं ।

पर्वा नाहिं अम्हां मुळी सुरु असो लोकांचि ती वल्गना ।

त्यांची ना अमची जुळेल कधिं ही सौख्याचि ती कल्पना ।

वाटे जे सुख त्यांस ते क्षण टिके वारो कुणा फार सें ।

जातां यौवन जोमाची जयिं लाट ओसरतसे वाळूच वाळू दिसे ।
ज्यांनाही विषयैकता विषमयी दुःखातही आवडे ।
त्यांनी पाहु नये मुळींच आमच्या (/इकडे ) निर्भेळ सौख्याकडे ।

—----

Page 130

(२०.०१.१९३६)

## आहे न नवरा, कसाहि मग तो!

' आहे ना  नवरा! कसाहि मग तो, कुंकास आधार हा ।
म्हातारा अथवा युवां पण असो , प्राणास आधार हा ।
त्यांच्या मारि तसे जीवा वर उभ्या , सांगू किती मी तरी ।
उंची हीं लुगडीं पहा भरजरी , पोषाख नाना परी ।
गोठांचे किति जोड हार चमक्या , तोडे कुड्या बांगड्या ।
उंची अत्तर ; पुष्पहार गजरे; खायास लाडू  वड्या ।
ग्रामोफोन रिकार्ड गोड असती ,हार्मोनियम रेडीओ ।
कोणा काय भिकारड्यास मिळते हें सौख्य बाई अहो ? '
' डोळयांतील रुसें  दिसे कुसळ हें, श्रीमंतिणीला तुला ।
नाहीं बाई स्वतांस ते मुसळही ये पाहती आपल्या ।
तूं सौभाग्यवंती खरीं मिरविशी त्वद्भाग्य स्वामिनी नसे ।
चैत्राच्या महिन्यांत नांव हि तुला ते घ्यावयाचे नसे ।
साऱ्याहो भरतो अम्ही खणें ओट्या तुझ्या नव्हं ।
आशीर्वाद तुलाहि दे ति द्विजते ' ( त्वं /) तूं अष्टपुत्रा भव' ।

Page 131

श्रीमंती तुमची तुम्हांस असुंद्या आम्हां गरीबी  बरी ।

बाई झोंपडिच्या मधे अम्हां पण कळे प्रेमाचि मातब्बरी

चारनायास मिळे अम्हा परी रसमयी  प्रेमातली माधुरी ।

—---

Page 132

(दिनाङ्क:१४.०५.१९३२)

गगग रेग ममम मग रेंगमप गमपध पधपम गरे सारे ।

छुम् छुम् छुम् मृदु मंजुल पैंजण वाजु दे तूं नाच नाच थय थय थय सखि ।

अंतरा

' निकोमल

निनिनि धप धधध पम पपप मग ममम मग रेगमप ।

ये ये थे हळु नेत्रीं जो मधु देदेतो पिउ ये नाचू मग मिळुनीग ।

गमपध पधपभगरे सारे ।

आनंदाने थय थय थय , सखि ।

—---

Page 133 BLANK

Page 134 BLANK

Page 135 see ये ऑफिसातुनि…..
at Page 93

Page 140

# उसविलेला शर्ट

(२१. १. १९३६)

" काखे मध्यें शर्ट उसविला । ये,ये, शिवुनी देई त्याला ।"

"पर्वा हा ना नवाच केला ।

अंगामध्ये काल घातला ।

आज कसा हा असा उसविला।

सांभाळुनि हो कां नच घाला?
आंगामध्यें घालायची।
बाई नेहमीं घाई तुमची ।
गोष्ट असे हो ही शिकण्याची।
माझ्यापासूनि कां अपल्याला?
झालें जें तें झालें आतां।
काढुनि द्यावा मज तो नाथा।
आंगावर ये मज नच शिवतां।
आणूनि द्यावा इकडे मजला।
'शिवूं नये कधिं आंगावरती' ।
जुनी असें ही अपली रीती।
टोंक (सुई) टोंचण्याची मज भीती।
म्हणून म्हणते द्यावा मजला" ।

Page141

"आंगातुन तो मी नच काढिन।
तसाच हा बघ घालून जाइन।
जाइल हुर हुर मग तुज लागुन ।
ये सोडुन सगळ्या कामाला"।
हळू हळू ती उठे, चालते।
म्हणतें 'अमचें कधीं चालते'!।
' काख करा वर अपुली; लवते ।
बघते म्हणते 'कुठें उसविला'।
हात उचलले गळ्यांत पडले।

गर गर गर गर  डोळे फिरले।

'खरोखरी मी अगदीं फंसले।'

म्हणे 'डाव मज पुरता कळला'!!!

Page142

# कां कुणाला बोलले मी

कां कुणाला बोलले मी, काय कोणी ऐकिले ।

कान भिंतीला असावें, हें खरें का जाहले ।

काय  एकांतामधें ,चोरी असें बोलावया ।

चोरूनी तें ऐकलें कोणी ,मनीं मी बोलले ।

मी जरी लावून कांही बोलले,  माझ्या मना ।

त्यांत गेलें काय त्यांचे ,वावुगे कीं जाहलें!।

Page143

# 'मी आपणास विसरेन'

'मी आपणास विसरेन'? घडेल हें का ।

जेव्हां कळे निज मान: स्थिति एकमेका।

केला प्रणाम नजरी, दिसला अबोला ।

काहो तिथें प्रणय भाव  न काय बोला ।

कोणी मुका प्रणय मुग्ध असे मनांत।

सांगे न भाव अगदीं अपले जनांत।

स्थापी   परी हृदय- मंदिरिं मूर्ती रम्या ।
नाहींच जी कधिंहि प्राकृत बुद्धी गम्या।

Page144

## कशाचा राग कां आला

कशाचा राग कां आला मला नाहीं मुळीं कळलें ।
विनवणी सारखी केली तरीही ओंठ ना खुललें ।
मुखाच्या घट्टकुलुपाला कशानें सांग मी खोलू ।
उपायांची पराकाष्ठा जरी केली न तें हसले ।
बिघडलेली घडी किंवा कशी मी सांग जमवावी।
अतां  नेहमी करितां जुने संबंध का तुटले ।
अतां मी  हेच समजू का सदा ते भाव विस्कटले?
जरी मी बोलले जास्ती खरें तें वाटलें त्यांना ।
कळे खोटें न त्यांना जें खऱ्याच्या पोटिं कीं लपले ।
जरी मी ताणले डोळे तरी डोळयांतले भाव ।
कसें मी त्यांस कळवावें न पाणी नेत्रिंचे खळले।
जरी मी बोललें पर्वा न मला पर्वा नसे त्यांची।
न बेपर्वाइच्या भाषे मधें कांहींच कां भरलें !।
न मानेचा असा हिसका न हाताचा असा हिसडा।
जयाने बंध हे सारे जुने कीं हों असे तुटले ।
कळेना ज्यास केव्हां ही कशाला कोण कां बोले।
तयाला हात जोडावे असे जे व्यर्थ कीं फंसले।

—----

Page145

# मला घाला तुम्ही भिक्षा

मला घाला तुम्ही भिक्षा उभो मी दारी केव्हाचा।
 विनंती मी किती केली आता ही खुंटली वाचा ।
रिकामी काय झोळी मी अशी ही येथुनी नेऊ ?।
कसे सांगू कुणा सांगा असा लौकिक नांवाचा।
 मनाने ऐकल्या हांका मनानें घेतली थांब ।
असे का खेळ खोटा या मनांच्या रम्य भावांचा।
 भिकारी मी न जन्माचा न केव्हां तोंड वेगाडी ।
न मागाया प्रसादाला घरीं आलो भिकाऱ्याच्या ।
मिषानें का निराळा या तुम्हीं हा देतसा टाळा।
 तसा होतो समज काही न खायाचा न प्यायाचा ।
दिसे बागेंत या अपल्या विकासाची पराकाष्ठा।
 फुलांच्या वैभवा आला लुटाया पुंज भृंगांचा  माळांचा।
 सवें  त्यांच्या  इथें आलो कुणाचें काय घेतो मी ।
 भुकेला मी निसर्गाच्या असे सौंदर्य पानाचा ।
इथेंही पाहिली वेली बसूं कां सावलीमध्यें ।
मिळो देवा मला मेवा इथें पाहूणचाराचा।

—----

Page146

# निखारे धूर क्रोधाचे

निखारे धूर क्रोधाचे अशी तू सोडिते हें कां?।
त्वरेनें चालली गाडी ना सोडी आपला हे कां!।
दिवाळीच्या प्रसंगी ही न देई कांहि कन्सेशन (ही सूट) ।
प्रवासी थर्ड क्लासाचा असे हा दोष माझा का?।
न काही आवडी माझ्या न किंवा नावडी माझ्या !।
न किंवा जीवही माझ्या म्हणूनी ही उपेक्षा का?।
किती जाती प्रवासी ते न घेतां कोणतें टिकीट।
तुला हें चांगले वाटे असें मानूं खरें मी का?।
मला ही आज इच्छा ती असे झाली विहाराया ।
जगत्सौंदर्य मी पाहू तुझ्या अंकाश्रयानें कां? ।
तुझ्या साह्या विना कैसे लुटू मी जीवनानंद ।
अशी तू सोडुनी जाशी मला या स्टेशनी तें कां?।
न मी कांहीं कमी कोणाहुनी कीं वैभवानें ही ।
मनाची भाव संपत्ती जगी ती श्रेष्ठ नाहीं का?।

—----

Page147

## प्रतिभा -विरह (वियोग)

झाले किति दिन जवळि न येशी।
उगीच कां तूं माझ्यावर रुसली।
बिजली परी तू असशी चंचलिक ।

द्युति वितरिशि क्षणिक  सुमंगल।
 हृदय मंदिरा करूनी  उज्ज्वल।
 दिगंतरी तूं विलीन होशी ।
 प्रथम भरूनि मनिं मंजुर नाद ।
असा देउनी मला प्रसाद।
 झाला का मजकडुन प्रमोद।
 ज्याने केल्या लोभा विसरिशि।

 हृदया थय थय नाचविणारी ।
विश्व मंदिरा रंगविणारी ।
सृष्टी देवि सह तूं रमणारी।
 कां मम हृदयीं तूं न कां न प्रगटशी।
—----

Page148

# अग ए मज बोलुं तूं नये ।

अग ए मज बोलुं तूं नये ।
थकुनी मी नुकता घरांत ये (नुकताच येथ ये) ।
पिउं दे मज तूं विडी चहा।
 मग मी ऐकिन वाव-  प्रवाह हा।
उठल्या सुटल्या विडीवरी । किति मी ऐकुं पुराण हें तरी।

विडीचा महिमा न तो कळे तुज वेडे ।
किति सांगु बावळे ।
थकवा कितीही मला असे ।
उडुनी तो झुरक्यांत जातसे ।
झुरक्यांत  सुगंध सांचतो।
झुळुकींतील प्रभाव भासते भासतो ।
कितिही मनिं खिन्नता वसो।
किति तूं रागावली नकां असो ।
पळतात विचार तामसी ।
स्फुरतें दीप्ति नवीन मदीय मानसीं ।
वदनांतुनि नासिकेंतुनी ।
निघतां धूम्र तरंग आंतुनी ।
स्फुरते प्रतिभा धुरां तुनी ।
जणुं ती नील नभांत चांदणी ।
धूर करि नभांत नर्तना ।
स्फुरवी रम्य नवीन कल्पना ।
पटलावरि त्या तरंगती  ।
नवदृश्ये रमणीय आकृती |
उपजे मनिं एकतानता ।
गगनीं तार अपूर्व लागता ।

Page149

(१. ११. १९३६)

स्फुरती  किति  प्रश्न उत्तरे ।

कळती जीं  न कधीं कुणा वरें ।

उकलें मज  गूढ जें जगीं ।

लपलेले असलें जरी ढगीं ।

घनरूप तमांत संसृती |

तळपे  विजळी घनांतरीं घन मंडपी वीजशी स्फुरे ।

विलसे रात्रिं शरीरिं जागृती |

तशी दीप्ति मयी निजांतरीं ।

पटला आंत विडी खुले तरी ।

म्हणती कुणि ती विलासिनी ।

कुणी मानीत मनोविनोदिनी ।

समिधा कुणी तीस मानुनी  ।

गृहमेधी  कुणिं धन्य हो मनीं ।

मज लावि समाधि ती परी ।

करि ना कोणि तिची बरोबरी? ।

म्हण  काहि खुशाल तू मला ।

रुचतें जें नित्य हवे तसे तुला ।

हिज लाविन बोल काहिही ।

कुणि मानिति कीं (वखाणिती) विडीहूनी धवलांगी सिगरेट मोहिनी ।

मज आवडते विडी परि ।

न रुचे कोणि न अन्य सुंदरी ।

—----

Page150 BLANK

Page 151 BLANK

Page 152

## मंगलाष्टके

घालूनी मृगचर्मयुक्त  विमला यज्ञोपवीतास हा ।

हाती दंड कमण्डल चिमुकला कौपीनधारी हा ।

मुंजे ची किति शोभते कटीतटीं  की कांचनी मेखला ।

श्रीमन्मंङ्गलमूर्ति बाल बटू हा कार्या करो मंगला ।

ओलांडून समुद्र तात मिळवी विद्या परा पासुनी।

येवो पैलतीरावरून शिकण्या ते ती तुझ्या पासुनी।

बापाहून गुणें तसा मतिबलें हो श्रेष्ठ तू आगळा।

श्री गंगाधर पुत्रबाल बटु हा  कार्या करो मंगला।

भाळीं साक्षात् श्री कमला  भरी मळवटा लावी वरी अक्षता।

कुंकाच्या पदिं इंदु काढीत असे जोडा करांनीं स्वतां।

मोत्यें  गुंफुनि चांदण्या जणुं  त्यास गुंफुनि बाल भाल गगनी  मंडावळी बांधल्या।

राजाचा सुत हा  सदाशिव सदा कार्या करो मंगला।

शोभे राजकुमार तुल्य बाल बटु हा   कार्या करो मंगला।

झाला हा व्रत बंध  घे व्रत, नवें दीक्षाहि नवी तुला आवडो।

बाळा पाळ स्वधर्म कर्म अपलें, कल्याण ज्यानें घडो ।

ज्यानें मंगल हो घरीं निज कुलीं देशांतही आपल्या।

मार्कंडेय मुनी परी तव यश कार्या असो मंगला।

Page 153

वंदे गौरी सुतं देवं सर्व विघ्नोपशांतये ।

मांगल्यानां निधानं तत् कुर्यात्

सर्वत्र मंगलम् ।

आयान्त्वद्य शुभे दिने सुरगणाः देव्यादिभिर्मङ्गलाः ।

श्री गंगाधरधामन्यवंति नगरे श्रीक्षेत्रे जगत् महत्पावनें ।

सा देवी हरसिद्धीरेतुस सुता भव्ये सभामंडपे।

साक्षादत्र सदाशिवः शिवचरः कुर्यात् बटोर्मङ्गलम् ।

—-----

Page 154 blank

(खालील मजकूर पेंसिल ने लिहिलेलं …)

माझें काय कशी ग मीं ।

आल्या पाउलिं जातसे पण पुढें तूं आपलें ते पहा ।

Page 155

(०१.०३.१९३६)

## वाटे मुलीस जरा हौस विणावयाची

' वाटे मुलीस जरा हौस विणावयाची ।

आणाच लोकर हि लौकर आज तीची।

हो, हो , म्हणून दररोज तिला म्हणावं।

पोरीस हो असं कसं किती चाळवावं '।

"त्यां ना म्हणे जरि असेल दररोज आई।

ते ऐकती न कधिंही करूं काय बाई"।

" ते गऽ तिचं कसं बरं बघ ऐकतील! ।

वेडीच तू पण पुढें तुज हें कळेल।

—-----

# येतां! या! पण याल ना कधिं मधीं?

**श्री डॉक्टर गंगाधर लक्ष्मण खिरवडकर एफ्.आर्.सी.एस्. यांस  समर्पण**

**तारीख ०३.०३.१९३६**

श्री गंगाधर लक्ष्मणोऽखिल भिषग्विद्यावतांमग्रणीः ।
प्रस्थाप्यात्र चिरं प्रयाति नृमणि ज्योत्स्ना भिरामं यशः ।
भूयात् तस्य दिने दिने शशिसमा वृद्धिः कलासंचये ।
मांगल्यं भवने तनोतु भगवान् गंगाधरः श्रीमताम् ।

येतां! या! पण याल ना कधिं मधीं? भेटाल ना हो पुन्हां?।
आहे हे घर आपलें ,आम्हि तरी आहों कुणाचे म्हणा ।
आहे 'मंडळ' बाळ वर्ष नुकते कीं साहवें लागले।
केली मुंज हि ना ,न मोहन असे मनोहर जसे हें बाळ कां आपलें?।
ज्यांचें जीवन नित्य सार्वजनिक प्रेमामधें गुंफिलें।
वाटे तो सगळ्याच उज्जयिनीला अपलें की प्राण देहांतले।
नांवे देह विभिन्न किंतु, बसलों एकाच नावें मधें।
कांठाला पण नांव लागली नसे जातां कसें हो मधें।
आहो आपण कर्णधार आमचे नौका असे वांग्मयी।
तिचे कोण सुखाने घेईल करी चिंता असेही नवी।
आम्हाला तुमची किती गरज यावेळेस जाता तुम्ही।
ठेवू आठवणी जपून तुमच्या ती ठेव मानू आम्ही।

खात्रीही परी आमची कधीतरी होईल तुम्हास्मृती।
रात्री ती रुदय इस पुरेल तुमच्या तारांची जैसी होती।

Page 157

पंतोजी कुणि कोपर्यांतिल कवी त्या द्या मनीं कोंपरा।
क्षिप्रेच्या वरला निरिच्छ विनयी जोगी असे तो बरा।
ग्वाल्हेरीं तुनी ही अम्हांवर कृपा ती पूर्ववत् राहू द्या।
स्नेहें पत्रहि पाठवा मिळुवुनी सत्कीर्तीचा भाग द्या।
जा जा जा वर आणखी विकसुंद्या मानस घालवी दृष्टी तशा भावना।
पाहाया क्षितिजाकडे वळुनी क्षिप्रावता पावना।
योगा शमवि जो शारीरिकी यातना।
द्यावे काय तया जगीं जीववि जो दे जीवदाना जना ।
तेजोने निज मंडळांत तळपे केंद्रात साह्या विना (सन्मानपत्र विना) ।
त्या मित्रा करिं राम अर्पण करी या गुंफुनी भावना।

आपला (जुना मित्र) हितेच्छु - मित्र
रा.वा .पंतोजी

—---

Page 158

# पाहु दे ताई । तळहात तुझा मज बाई

पाहु दे ताई । तळहात तुझा मज बाई ।
किति तरि पडले हे गऽ फाटे ।
जाती रेघा भलत्या वाटे ।

जुळणी नाहीं त्यांची कोठे।
काय हें बाई ॥
रेखा जुळल्या म्हणजे म्हणती।
हृदयें दोन्हीं अगदीं जुळती।
असलं आहे माझ्या हाती।
काहिं संऽ पाही।॥
ताई म्हणते अपल्या चित्तीं।
या रेघा कां घटना कळविती।
दैवाला कां आंकन करिती।
मज ठाउक नाहीं।॥

ओळीची कशि होय जुळवणी।
हृदयांची ही कशी मिळवणी।
करूं कुणाला कशी विनवणी ।
सांग ना माई॥

—--------

Page 159

# माझे दीर हि कसे

**(प्रकृति बरी करण्यास दिराच्या घरीं आलेल्या भावजईचें पत्र नवऱ्याला)**

माझे दीर हि कसे।माझ्या जावहि कश्या ॥
माझे पुतणे कसे। माझ्या पुतण्या कश्या॥
येथें झाडें हि कशीं। येथें सांवल्या कश्या॥

येथें  वारा हि कसा । येथें झुळुका कश्या॥
 इथं पाणी हि कसें । त्याची गोडी हि कशी ॥
 इथं राहणं कसं ।  इथें राहणी कशी ॥
तिथं माझं सासरं । इथं माझं माहेर  ॥
 वाटे मजसि बरं । किति लिहुं मी बरं ॥

—-----

Page 160

## पाळणा

बागुल बाबा ।  बघतो आला ॥
निज तान्हुल्या। निज रे बाळा॥
 खेळ खेळला । दिवस गेला  ॥
 नाहिं नीज कां । लागो रे  डोळा॥
 जो जो रे जो जो ॥
मांडीवर मी । घेते तुजला  ॥
 थापटित असे । उगि रे बाळा ॥
 रडरडु नी  ।  आकांत केला ॥
 नाहीं नीज का ।  लागू दे डोळा ॥
 जो जो रे जो जो ॥

सांबर शिंग ।सुंठ उघाळा ॥
भुई मीठ कीं ।   कपाळीं घाला ॥
हिंग गोटा द्या । घुटी   द्या याला ॥

नाहीं नीज का। लागू दे डोळा ॥
जो जो रे जो जो ॥

Page 161
थापटिता मी। हात दुखती ॥
ह्याचे हुंदके।हे ना थांबती ॥
काय ते होते। कळेना बाळा ॥
नीज न ये का। लागूं दे डोळा ॥
जो जो रे जो जो ॥
किरकिर हा। सारखी करी ॥
नेऊं नका ग। कुणाच्या दारी ॥
दृष्ट लागली। माझ्या ग बाळा ॥
नीज कां न ये। लागे ना डोळा ॥
जो जो रे जो जो ॥

मीठ मोंहऱ्या। या ओवाळल्या ॥
चुली आंत त्या। तडतडल्या! ॥
चुलीत घाला। इडा पिडांलां ॥
नीज न ये का।लागे ना डोळा ॥
जो जो रे जो जो ॥

मान याची का। अवटळली ॥
मानेची खीळ। खिळ खिळली ॥

फिरवा अता । या लाटण्याला ॥
नीज न ये का । लागे ना डोळा ॥
॥जो जो रे जो जो ॥

Page 162
झुले चांदोबा । आकाशामध्ये ॥
सृष्टी जननी । बाळा त्याला धोका दे ॥
तारका करें । झोंका चंद्राला ॥
देती बहिणी । जशी भावाला ॥
जो जो रे जो ॥
पाळणा हाले । फांद्या पानाचा ॥
बाळ झुलतो । वेली बाईचा ॥
कळ्याहि हालती । सवें डोलती ॥
थयथय त्या । नाचू लागती ॥
जो जो रे जो जो ॥

चंद्र कळेच्च्या। घाली पदरा ॥
रात्र निजवी । साऱ्या संसारा ॥
भरलेल्या या । माझ्या संसारा ॥
उजळवितो । माझ्या हा हिरा ॥
जो जो रे जो जो ॥

कुलदीपक | माझा हा राणा ॥

माझ्या गोकुळीं ।  माझा हा कान्हा ॥

नंदनवनीं । कल्पतरू हा ॥

पाकळया झांकी ।  डोळयाच्या पहा ॥

जो जो रे जो जो ॥

Page 163

माझ्या जीवाचा ।  बाळ विसावा ॥

घेऊ द्या त्याला ।  आता विसावा ॥

गलबला गऽ ।  करू नका हा ॥

कारटांनों जो । निज ला पहा ॥

जो जो रे जो जो ॥

निजला ग हा । ओंठ हालती ॥

—---------

Page 164

# जीवित तें कसलें जगिं (भाषांतर)

What is this life; full of care

We have no time to stand and stare?

No time to stand beneath the boughs

And stare as long as sheep or cows

No time to see, when woods we pass

Where squirrels hide their nuts in grass

No time to see, in broad day light

Streams full of stars likes skies at night

No time to turn at beauty's glance

And watch her feet, how they can dance

No time to wait till her mouth can

Enrich that smile her eyes began

A poor life this if, full of care

We have no time to stand and stare

Page 165

14.04.1936

Exam hall

Translation

## जीवित तें कसलें जगिं

जीवित तें कसलें जगिं ज्यांत जरीन काळजी कसली।

तिष्ठत राहून उभे राहूनी उगिंच पहाया सवड नसावी असली।

झाडाखालीं उभे राहण्या. वेळ मुळींन मिळावा।

गाइ मेंढरा उगिंच बघाया वेळ न व्यर्थ असावा।

खारी आपले खाद्य लपवुनी. ठेविती गवता आंत।

जातां आपण वनांत वेळ न जावो त्या बघण्यांत।

वेळ नसावा दिवसा ढवळया. सोडुनि पाय बसाया।

सरित्प्रवाहीं रात्रीं . तारक बिंब बघाया।

सुंदरतेच्या अपांग दृष्टी कडे वळाया वेळ।

नसो   बघाया तत्पद गति तत् नृत्याचे खेळ।
वेळ नसावा वाट पहाया नयनाची स्मित माला ।
अर्पण कसें करी नव वैभव तदधर  पुट स्मिताला।
निर्धन - कृपण असें हें जीवित जरि न काळजी कसली।
उभे राहुनी व्यर्थ बघाया.  सवड मिळे जरि असली।

—----

Page 166

17.04.1936

# पति जीवन-गीत संगिनी

**Prof Roy(History) at Victoria College. His death occurred in April while his wife was on death-bed.**

पति जीवन गीत संगिनी।
हरिणीच्या परि एक कामिनी
कोमलाङ्गिनी ( हरिणीतुल्य विलोल लोचनी)
कुणि अति सुंदर एक कामिनी।
क्षयरोगें पिडिली सुहासिनी
शुभ निर्झरिणी वनांतली ।
उगमस्थानिंच  पूर्ण वाळली
अथवा जणु (वाहिनी)  ती नदी वाळु लागली।
सुकले जीवन, जल आटे दिसुं वाळु लागली।।
शरीरां तरिं जीवनांतले
सगळे खेळ क्रमांत थांबले

उरली अति क्षीण आकृती
विधिची ती विकृता कलाकृती।।

सहचारिणी मस्तकाधरी
पति तो प्रेमळ मांडिच्या वरी
फिरती वदनावरी करा
अमृताची तिज  वाटला झरा ।।

नयनांतुन ओघ चालला
मग डोळा क्षण एक लागला
दिसुं लागति भीषणाकृती।
सतिला ज्या बघते न संसृती  (जागृती)

Page 167

उचली तिज वाटले कुणी
जखडी आवळपाश बंधनीं
म्हटले कुणि कर्कशें स्वरें
तुज  नेईन इथून मी बरें।।
इथली कसलीहि शक्ति ती
अडवू न शकते च मद्गती
कळवून भविष्य तें असे

कुणी क्रूर आकृती  गुप्त होत असे।।
उघडून (कवाड) कपाट पापण्या
मग लागे बघुं प्राण जीवना
अति केविलवाणि दृष्टिनें
कळवी भाव पतीस ती मनें।।
हृदयांतिल मूक - भावना
हृदया ये पतीच्याच जाणता
फुटुनी किति बांध आंतले
नयनीं चारि प्रवाह चालले।।

किती भाव समाकुला सती ।
अथवा व्याकुल तो किती पती।।
कविता कळवील काय तें?।
अबला लेखनि  काय सांगते ?।।

Page 168

शयना वर शीर ठेउनी
उठला तेथुनी तुम्ही दृश्य सर्व पाहुनी
मग येउन मंचकावरी
निजला व्याकुल पूर्ण अंतरीं।
निजला. निजलाच राहिला
उठलेला कुणिही न पाहिला
जमुनी म्हणतात मंडळी
कळुं द्या ना तिज  बातमी मुळी।।

तिकडून निघे तिचा पती
इकडेही निघते खरी सती
शशी मागुनि कांति जांत असे
दिवसा मागुन रात्र ये जात असे
पळता नर सावली पळे।
पतीच्या रुपिं तशी सती मिळे॥

सरिता ती जलधी मधें मिळे
चमकुन जगाचिया वरी
बिजली या परि गुप्त अंबरीं॥

विधवा असुनी सुवासिनी
समजे आपण भाग्यशालीनी
Page 169

असलीच विचार मालिका।
असतां, लोपलि दिव्य तारका॥

मणि मंगलसूत्र कुंकुमा
तिज घाला जरि ते रुचे तुम्हां
मज वाटत ती सुवासिनी।
अति धन्या पतिभाव संगमी (मीलनीं)
Page 170

## प्रतीक्षा

अशा यावेळीं ।पाहिजे कुणीतरि जवळी ।

नवचैतन्यें रसरसलेली

पानें जी ची सळ सळ सळली

झाडा भेटे प्रेमे वेली

मीच अशी ऐकली

पक्षि युगुल हे घरट्र्या आंत

प्रेमालापा कुजबुजतात

करूण रसाची गाणीं गात

मीच अशी एकली

गगनी कुणि ही एक चांदणी

कुणाचि बघते वाट साजणी

शशी वर येता हंसे पाहुनी

मीच अशी एकली

भेटति कडकडुनी दिन रजनी

गुलाल उडवी अवनी गगनी

संधी समयिं या रञ्जितभुवनीं

मीच अशी एकली

Page 171

'कोण हवें तुज ही मी आले

तुझे' एकटेंपण गेले

जा,येथुन मी बरी एकली

चल, चहाटळ कुठली

## आली ही लेकुरवाळी

निज प्रेमाच्या पदराखालीं नेहमि शिशु संभाळी
निजवि तान्हुल्या ,कोरड्यांत,  पण मनिं आपण थबथबलेली
ओल्या मध्यें हात न घाली उठुनी रोज सकाळी
चिंच न  खाई बाळा करितां पथ्य हि पाणी पाळी
 घारी परि भिर भिर  फिरते घिरट्या  शिशु जवळी घाली
(झेलत बाळा चेंडू परी ती  जय जय नाचत आली )
 अपला चिमणा रांगत हिंडे आडुन त्यास निहाळी
 झेलत बाळा चेंडू परी कधी थय थय नाचत आली
रुक्ष जगाला विसरे  बाळा बघुनी रसरसलेली
अंगाई ची गाणीं ऐकतां गाणीं गाई  माझी ऐकत वृत्ती निमाली

—---



परीक्षा हाल

21.03.1936

## परीक्षेच्या तीन घंटा

 पहिली घंटा होतांच संपले बाल्या चे खेळ ।
जीवन पहांट सरली कीं ये तारुण्याची वेळ। पाहतां पाहतां वाजे दुसरी घटके मध्ये घंटि।
लयास गेली बाग, नुरे मग यौवन -वैभव थाट।

फार सुरकुत्या आंगावर जणू विणी पारधी जाळें।
ओढुनि कुणि धरिले जणुं जाती खोल गाल मग डोळे।
लटपट खटपट मुळिं ना चाले   पाय किती लटपटले।
स्नेह हीन ही ज्योती सळली डोळे अंधळे झाले।
ओढाताणी मध्यें असत्या खचली कंबर झुकली।
चालत नाहि मी मान सांगते लुडबुडली जिभली।
तिसऱ्या घंटेची मज भीती सांगू कितितरी वाटे।
आटे जीवन तळें वाळलें ममकंठ ऊर दाटे ।
तंद्री लागे पैल तिरावर उठले भीषण नाद।
डोळे मिटले पडदा पडला सुटले ऐहिक वाद।

सुटला एकहि प्रश्न न जीवनिं दिधले कागद कोरे।
हिशेब होता शून्य दिसे गुण शून्यी विरले सारे।

Page 174

18.03.1936

परीक्षा हाल

# एका हरिजन मुलाचे निधन

**(बॉम्बे क्रोनिकल १८ मार्च 1936 डेथऑफ अ स्वीपर बॉय एज्ड 18 इयर्स व्हेन पंडित मालविया वेंकट टू गिव दीक्षा टू हरिजन्स मिस्टर आंबेडकर थिंकिंग ऑफ हिज़ कन्व्हर्शन)**

**(Bombay Chronicle 18.03.1936, death of a sweeper boy aged 18 when Pandit (Madan Mohan)Malviya went to give दीक्षा to हरिजन. Mr Ambedkar was thinking of his conversion)**

नाशिक क्षेत्रीं दुही माजली धर्माचे अभिमानी
हट्टा पेटति; पाहुनि हरिजन शिशु विचार मनिं आणी
नेते अपले विचार करिती धर्मांतर करण्याचा
पाहुनि बाळा वाटे बरवा मार्ग असे कीं मरण्याचा
' धर्मे निधानं श्रेय: ' त्याच्या तत्त्व मनीं हें ठसले
धर्मांतर हें अयोग्य वाटे अंतर गद् गद् गदलें
वाटे जिणें नको मज जगतीं. जगणें म्हणजे मरणें
तरंगणे वर म्हणजे बुडणें. असणें म्हणजे नसणें
आज नाहिं जरि पुढें कधींतरि तुटेल जीवन तंतू
पुलावरुनि मी उडी मारितो मनिं नच किंचित किंतू
धर्माची ती ज्योती सनातन हृदयीं तरि पाजळली
पैल तिरावर अथवा जाया दिवटी निज करिं धरिली
जुलूम अन्यायाच्या झंजावातात हि ना विझली

फुंकर घालिती विविध उपायीं तरिही हृदयीं टिकली
म्हणे बाळ 'मज तुझ्या जीवनीं मिळुं दे विरुं दे आई!
प्रवाह पतिता मज दे उदरीं ठाव तुझ्या लवलाही
तुझे पिउनी पय शिशु आम्हीं संत असंत अनंत
मोठे झालो लहान मोठे. कीं गरीब किंवा श्रीमंत्



सख्खा परका साधु पतित वा उच्चनीच या भावा
तुझ्या तरङ्गित हृदयामध्यें भेद कधीं न बघावा

नसां नसांतुनि माझ्या तूझें जीवन खेळे गोदे!
मांडीवर मी निजावयाला येतो आता मोदें
हांक मारिली गोदामाई! जय जय जय गोदे !
लाटा उसळति आंतुनी आई वाटे बाळा 'ओ' दे
तरङ्ग हस्तें बाळा झेली आर्द्र हृदय ती आई
जल पटलाच्या पदरा खालीं झाकी हृदया लावी
उठति बुडबुडे बुडतां शिष्य जणुं गोदा गंहिवरली
पोंच पावली काठांवरच्या वाचति झाडें वेली
दृश्य जगाच्या दृष्टीनें हें बालक नुरलें विरलें
विरघळला तो खडा वाटला ( वाटें नांव उरले ) बुद् बुद वरती उठलें
उडी मारली खाली. गेला वर पण वैकुंठ लोकां
'वाईट झालें' खुळे म्हणति जन कळतें तरि कां लोकां
घण घण घंटा वाजू लागल्या पैल तिरीं वैकुंठीं
झडती चौघडे आरति झाली माळ पडलि शिशु कंठीं

Page 176

जगत्पिता हरि, त्याच्या मांडीवर हरिजन शिशु बसला।
जननी गोदा पाहि कौतुका अढळ पदीं ध्रुव चढला।
ध्रुवा परी तो दिशा दाखवो अजाण कर्मठतेला।
उत्तर दक्षिण हिंदुस्थानीं पसरो नव किरणाला।
जिथे बुडाला तो शिशु घेउनी केरसुणी ब्रश अपला
उच्च जाती हृत्पट मल धुवुनी टाको जलौघ तिथला ।
गोदा शीतल जलकण पसरो लातट शांति समतेची।

स्पृश्यास्पृश्य  विषमता बुडवो दृष्टी हंसो ममतेची ।

—--------

Page 177

## बाळघुटी

**(विदुला -संजयाच्या उपदेशाच्या आधारावर)**

गंजलेली तलवार

पडल्या पडल्या  गंजुन गेली तलवार तुझी कांही ।

 पडल्या पडल्या जोम न उरला बिलकुल बळा कांहीं ।

 क्रोध जाउनी त्याच्या जागीं शिळपटा पण कां आलें ।

क्षमा कराया आंगीं कोठुन दुबळे पण हे आलें ।

कोणी आई असल्या बाळा जन्मनं कधिंशही देवो ।

ज्याला वाटे कोणी येवो कांहीं उचलुनि नेवो ।

भ्याड कुलाला कलंक रुपी बालक जन्मा आले ।

रौरव नरका मधें पूर्वजा सहतें जाणा गेले ।

छी: थू:   होते जगांत साऱ्या असल्या या तनयाची ।

शत्रूपासुनि खळगी भरण्या (पोटा) करितां जो कणकणकीं याची ।

तयार आहे सदा सलोखा शत्रूंशिं करण्या जगतीं ।
शत्रु मित्रही नीट अशा बाला निज चित्तीं ओळखती ।

नुसतां होऊ धूर तूं न दे प्रगटवि अपली ज्वाला ।
स्वाभिमान तो फटक्या सरशी कोठें तूझा गेला ।
तुडवावें पदिं तुला कुणीही जसें वाटते ज्याला ।

Page 178

सर्वस्व जयांनी नेले तूझे नाच शिरावर त्यांच्या ।
क्षणभर तळपुनि जरि तूं मेला खेद नमज तरि त्याचा ।

हताश होउनि मरण्यापेक्षा फडकवि कीर्ति पताका ।
विस्कटलेली घडी वसव तूं करूनी गोळा लोकां ।

तुझ्या खुणेची वाट पाहाती मोठाले रणधीर ।
समशेर घेउनीं धांव अरीवर होतील ते बघ चूर ।

चुली जवळ तूं रडतच बसला फुंकाया का चूल ।
इह पर लोका मुकशिल मनिं हे भरलें कुठलें खूळ ।

भितोस कां रे मरण्याला या टळते कां कधि मरण ।
आंगणात घरि झिजुनी मरण्यापेक्षां बरवेंच रण ।

पडल्या वाचुन चुकल्या वाचुन  कोणीं कधिं वर चढला।
दैव पांगळे समज तयाचे रडत राव जो असला।

फाकुन गेलेल्या या तेजा सांचव जागीं एका।
अंधारातुनि नि मार्ग काढुनि  तळप प्रभातीं एका।

रडतां रडतां मरण्यापेक्षा लढतां लढतां मेलेला।
म्हातारीचा जीव जाण हे ऐकायास भुकेला।

विजयश्रीला घेऊन यावे हवी मला ती सून।
यापेक्षा न बाळ सारखा मज तूं असुनी नसुन।

विहिरीमध्यें खोला जाउनी मोटहि निर्जीवती सरले सगळें पाणी।
त्याहुनी गाळलेल्या तू गेले कोठे पाणी?

मोटारीच्या चाकामध्यें भरा हवा त्या फुगती रागावुनि ती मार्गां  क्रमिती बघ तरी त्यांची प्रगती।

ऐकुनी आईच्या उपदेशा स्फुरले त्याचे बाहू।
एकावटे सामर्थ्य , वाटेल मंदर आपण वाहू।

वीर श्री सखि  विजयश्री सह संजय हर्षें आला।
माउलिं घाली त्याच्या कंठीं प्रेमाश्रूची माळा।

असल्या शब्दांनीही स्फुरतो. वीर श्री ना ज्यांना ।
देउ नको या आर्यभूदरीं. जन्मच देवा त्यांना ।

मेलेल्यांना नवचैतन्या. ज्यांची वाणी देते ।
त्या आयांना प्रसवी देवी. जय जय भारत माते ।

—----------
Page 179
(१९.०४.१९३६)

## ज्वर पिडित कृश काय पलंगी

ज्वर पिडित कृश काय पलंगी (पडला ) पहुडे प्रिय पती अपला ।
प्रेमें पाहुनि म्हणे प्रभु वरा रक्षी अनाथ ही अबला ।

चैतन्याची लाट ओसरे नुसता उरला ओलावा ।
जगत्पटावर पति चित्राचा पुसट दिसे तिचज देखावा ।

मिण माण लागे जळू दिवा कीं जणुं रात्र सरायाच्या वेळी ।
धुरळा पिळा किंवा उरली ठिणगी धुमसत असलेली ।
संजीविनीच्या गोळा अथवा विविध रसायन मात्रा ।
मात्रा कशाचीही ना चाले जुळवाया गळक्या पात्रा ।

धन्वंतरिही मोठे मोठे आले डॉक्टर अभिमानी ।

मांत्रिक तांत्रिक ज्योतिषि आले म्हणविति अपणा अति ज्ञानी

उपाय थकले, नाड्या सुटल्या खिळ खिळला तनुचा पिंजरा।
घरटा लागे घरट्यांतुन शुक उडतो वाटे करूनी त्वरा।

(असहाय गाय अबला ती…..)।
अनाथ अबलेचे, तें बघुनी डोळे दोन्हीं डबडबले ।
तों येई कुणि आंतुनि सांगे घाबरती तिकडेस मुलें।

इकडे आड विहीर हिन तिकडे तिची वृत्ती चंचल झाली।
बावरली गहिवरली बाला निं कळवळली खळबळली ।

( १९.०४.१९३६)

Page 180

तेथुनि जाया पाय न घेई. रहावया ना होय मन।
झुल्यावर परी झुलु अंतर लागे शेवटिं गेली ती तिथुन।

दोन्हीं बाळें गेलीं उरलें पिंजरे फिक्कट शरिराचे।
जिव शिवपक्षी शिशू उडाले पाश तोडुनी ममतेचे।

एकीकडुनी तिच्या मुखावर पसरे वैधव्य छाया।
दुसरीकडुनी निपुत्रिकत्वें अंतरीं लागे ती भ्याया।

प्रेम रसाची करूण  रसाची साक्षात् दिसली जणुं मूर्ती।
वासरास  मीग परतुन या या हंबरडा मग फोडे ती।

इष्ट आप्त तें पाहुन आले लवकर धांवुन तिज जवळी।
ओढुनी तिजे बाजूला करिती क्षोभें जी शिशु शव कवळी।

नेउन  बाजुस समजाविति तिज  धीर धरीं तू निज चित्तीं ।
प्रबल संयमें अडव आपली उन्मादाचीतव निज  वृत्ती।

अत्यवस्थ पति,  कळोन त्याला. शिशुनिधनाची ही खबर।
हळुहळु होइल बरा तुझा पति (डॉक्टर) डाक्तर म्हणती मन अवर।

क्षीण स्वरांने बोलवितसे. पति तिज, गेली ती आंत।
चोरी गेलीं रत्नें जरि, जें. उरलें तत्पर जपण्यांत।

Page 181

पतिस पाहतां मन खळबळले. घाली ती मनिं बंधारा।
विवेक संयम प्रबल करुनी. करीते औषध उपचारा।

तिची काळजी काय पुसावी. पाजी प्रेमाच्या गोटा ।
औषध पाण्यापेक्षा ज्याचा. प्रभाव पडला मग मोठा।

सुधारू लागली प्रकृती, परतली. चैतन्याची गत।
प्रश्न पुसतो जरी कितीदां कळवि न तनयांची वाट।
'खेळण्यास कधि गेले' म्हणते. म्हणते 'आहे ते तिकडे '।
शेजाऱ्याच्या घरी खेळती. आले म्हणून मी इकडे।

टाळे असले देता गेले. सहजच आठवडे दोन।
युक्ती युक्तीने डॉक्टर हळुहळु कळविति त्याला शिशु निधन।

दोन्ही मिळता प्रेमळ दृष्टी. खळबळ अंतरिं मग झाली।
वर्णन त्याचे करो कुणी जरिं. कवि दुसरा प्रतिभा शाली।
—------

Page 182

# अंधारात बसून

वैद्य उठतू उशी जवळूनी कळते तुजला काय
मनोरोग तू समवू शकशील

अंधारात बसून रात्र सगळी खोलीत मी काढली।
दारी बंद कुलूप ही कुणी पुढे बाहेरूनी लाविले।

जाया वाटत नसे(किती निरखुनी) स्थाने हि मी शोधिली।
कशास मजली शिक्षा कुणीही दिली।

काहीही न कळे विचार करून मी मानसी पाहिले।
अशि  काडीची म्हणती मिळे जरि कधी आधार तो ही बरा ।
तो ही ज्यास  नसे जिवंत असलो राहील का मानव
कानी केश

—-------
Page 183

# ही कोण ठेंगणी ठुसकी

ही कोण ठेंगणी ठुसकी । ध्रु०॥

डुलते भुईवर भुई कमला परि फिरकी परि घे गिरकी ।
उचकत  ठुमकत  कधिंकधि चाले मूर्तीमती  जशि उचकी ।

भुरके कुरळे केश उडता वर. किति ही गोरी भुस्की ।
खुळखळ बोले गडू मुखाचा इतकी कशिही हसकी   1

जाउं नये पण कुणिही जवळी म्हणती ही अति उसकी ।

रसरसलेली वरून इतकी आंतुनी अशिकशि कुचकी
वदनिं हिच्या हा खरा राग का  भरते उरिं धडकी

—---------
Page 184

फिरे त्या पावले मागे मी चालाया
तुझ्या छायेत चाले मी तुझ्या त्या पावली पाया

